श्रीमद्भगवद्गीतेच्या 4 थ्या अध्यायाचे नाव ज्ञान कर्म संन्यास योग असे नाव असून त्यात 42 श्लोक आहेत.

**श्री भगवानुवाच**

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्। विवस्वान् मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत्।।4.1।।**

श्रीभगवानुवाच - अहम् इमम् अव्ययम् योगम् विवस्वते प्रोक्तवान् । विवस्वान् मनवे प्राह । मनुः इक्ष्वाकवे अब्रवीत् ।

श्रीभगवानुवाच -

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

इमम् हा इदम् पु. द्वि. ए. व.

अव्ययम् अविनाशी अव्यय पु. द्वि. ए. व.

योगम् योगमार्ग योग पु. द्वि. ए. व.

विवस्वते विवस्वताला विवस्वत पु. च. ए. व.

प्रोक्तवान् सांगितला प्र+वच् धातू क्तवतु प्रत्यय पु प्र. ए. व.

विवस्वान् सूर्य पुत्र मनुला विवस्वत् पु. प्र. ए. व.

मनवे मनु पु. च. ए. व.

प्राह सांगितला प्र+ब्रू धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

प्र+अह् धातू विस्तार करणे. (बर्याच पुस्तकात ब्रू धातू म्हटले आहे)

मनुः मनुने मनु पु. प्र. ए. व.

इक्ष्वाकवे इक्ष्वाकु ला इक्ष्वाकु पु. च. ए. व.

अब्रवीत् सांगितले ब्रू धातू कर्तरि लङः लकार प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकात 3 महत्वपूर्ण नावे आली आहेत ती म्हणजे विवस्वान, मनु आणि इक्ष्वांकु. हिंदू धर्मातील समजुतीनुसार मनु ला मानव जातीचा प्रथम पुरूष मानले जाते. प्रत्येक मनु चे वय ठरलेले असते त्याला मन्वन्तर, मनु+अन्तर असे म्हणतात. अव्यय कधीही बदल होणार नाही अ+व्यय धातू खर्च होणे. महर्षी व्यासांनी कधीच संपून जाणार नाही असा योग असे अगदी आत्मविश्वासाने सांगितले आहे हे लक्षात घेऊन या अध्यायाचा आता अभ्यास करायला हवा. वैवस्वत मनु हा रघुवंशी घराण्याचा प्रथम पुरुष मानला जातो.

रघुवंश म्हणजेच इक्ष्वांकु वंश ज्या मध्ये श्रीरामांचा जन्म झाला. विवस्वान म्हणजे सूर्य. आधीच्या अध्यायात कर्मयोग सांगून झाल्यावर सूर्यासारख्या महान कर्मयोगीचा उल्लेख विशेष भावून जातो. सूर्य, इक्ष्वांकु, वैवस्वत मनु सगळेच संसारी.

ज्ञान हा खरा पुरूषार्थ आणि कर्म हे त्याचे साधन हे आपण आधीच्या अध्यायात शेवटच्या श्लोकात शिकलो. कोणत्याही गोष्टीचे खरे स्वरूप समजून घ्यायचे असेल तर त्याचा उगम आणि परंपरा ह्याचा अभ्यास माहित असायला हवा हा नियम महर्षी व्यासांनी येथे पाळलेला दिसतो. हा अविनाशी योग क्षत्रियांना(रक्षणकर्ता) आवर्जून सांगितला गेला ह्याची नोंद सुद्धा घ्यायला हवी. सूर्यदेवाच्या कृपेने तर जग चालू आहे.

यच्चक्षुरेष सविता सकलग्रहाणां राजा समस्तसुरमूर्तिरशेषतेजाः। यस्याज्ञया भ्रमति सम्भृतकालचक्रो गोविन्दमादिपुरूषं तमहं।। भजामि ब्रह्मसंहिता 5.52 ।।

मी आदिपुरुष श्रीगोविंद यांना प्रणाम करतो ज्यांच्या आज्ञेनुसार सर्व ग्रहांचा राजा सूर्यदेव अपार तेज आणि सामर्थ्य धारण करतो सूर्यदेव भगवंतांच्या नेत्रस्थानी असून त्यांच्या आदेशानुसार तो आपल्या कक्षेत भ्रमण करतो.

त्रेतायुगादौ च ततो विवस्वान्मनवे ददौ | मनुश्च लोकभृत्यर्थं सुतायेक्ष्वाक्वे ददौ | इक्ष्वाकुणा च कथितो व्याप्य लोकानवस्थितः।। महाभारत शांतिपर्व 348.51-52।। महाभारतातील ह्या श्लोका सारखे च केलेले वर्णन.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हा अविनाशी योग मी सूर्याला सांगितला. विवस्वान ने मनुला सांगितला. आणि मनुने इक्ष्वाकु ला सांगितला.

**एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः। स कालेनेह महता योगो नष्टः परन्तप।।4.2।।**

हे परन्तप ! एवम्  परंपरा -प्राप्तम्  इमम्  राजर्षयः विदुः । सः योगः महता कालेन इह नष्टः

हे परन्तप !

एवम्  अशाप्रकारे अव्यय

परंपरा -प्राप्तम्  परंपरेने चालत आलेला

परंपरा प्र+आप धातू क्त प्रत्यय पु. द्वि. ए. व.

इमम्  हा इदम् पु. द्वि. ए. व.

राजर्षयः राज ऋषयः राजन् ऋषि पु. प्र. ब. व.

विदुः जाणले विद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

योगः योग पु. प्र. ए. व.

महता दीर्घ महत् पु. तृ. ए. व.

कालेन काळ काल पु. तृ. ए. व.

इह अव्यय

नष्टः लोप पावला नश् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

आधीच्या श्लोकात सूर्यदेवापासून , इक्ष्वाकु पर्यंत अविनाशी योग कसा सांगितला गेला हे आपण वाचले. परंपराच सांगायची तर खालील श्लोक माहीत असायला हवा.

तेने ब्रह्म हृदय य आदिकवये मुह्यन्ति यत्सुराय:।श्रीमद्भागवत 1.1.1 ।। परमेश्वराने ब्रह्मा ला हा योग सांगितला.

आता ह्या श्लोकात महर्षी व्यास जणू काही आपली खंत व्यक्त करत असावेत. 3र्या अध्यायातील 20 व्या श्लोकात जनक आदि असा पुसटसा उल्लेख त्यांनी केला होता. कर्मयोगी चे वर्णन करताना कालिदासाने सुद्धा सूर्याची उपमा दिली आहे.

प्रजानामेव भूत्यर्थं स ताभ्यो बलिमग्रहीत् । सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रवि: ॥ (कालिदास / रघुवंश 1.18

राजा दिलीप प्रजेच्या हितासाठी (स्वतः साठी नव्हे) त्यांच्या कडून कर आकारत असत. जसे सूर्यदेव हजार पटीने जल वर्षाव करण्यासाठी पृथ्वीकडून रस घेतात.

एक महत्त्वाचा मुद्दा ह्या श्लोकात अधोरेखित होतो राजर्षी ह्या शब्दातून, पूर्वी चे राजे ऐश्वर्यसंपन्न असूनही ब्रह्म जाणणारे होते. ऋष् धातू जाणे ह्या पासून निर्माण झालेला शब्द ऋषी म्हणजे भटकणारा. वेदमंत्रांचा द्रष्टा म्हणजे कर्ता असा मूळ रूढार्थ. त्रिकालदर्शी अशी विद्यातपःसंपन्न व्यक्ती म्हणजे ऋषी. तपश्चर्या व ज्ञानप्रसार हे ऋषींचे सर्वप्रमुख लक्षण सर्वत्र वर्णिले आहे.अमरकोशात  सात प्रकारच्या ऋषींचा उल्लेख येतो, श्रुतर्षि, कंदर्शी, परमर्षि, महर्षी, राजर्षी, ब्रह्मर्षी आणि देवर्षी. मनुस्मृति मधे (4-94, 11-236) आणि कालिदासाने  देवऋषि, परम ऋषि, श्रुत ऋषि आणि कांड ऋषि असे शब्द सुद्धा वापरले आहेत. ऋषितुल्य अशा राजांना कर्मयोग माहित होता हे सांगून झाल्यावर महर्षी व्यास सद्यस्थिती म्हणजे महाभारत काळातील परीस्थिती वर्णन करत आहेत. ह्या श्लोकातील नष्ट ह्या शब्दाचा अर्थ संपून गेले असा न घेता लोक विसरून गेले असे म्हणता येईल.

जे प्राणियां कामी भरू । देहाचिवरी आदरु ।

म्हणोनि पडला विसरु । आत्मबोधाचा ॥ ज्ञानेश्वरी 4.20 ॥

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे परन्तप! अशाप्रकारे परंपरेने चालत आलेला हा योग राजर्षींनी जाणला. त्यानंतर दीर्घ काळापासून हा योग ह्या लोकांतून लुप्त झाला.

---

**स एवायं माया तेस्द्य योगः प्रोक्तः पुरातनः | भक्तोसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् || 4.3 ||**

---

मे भक्तः सखा च असि इति , सः एव अयम पुरातनः योगः अद्य मया ते प्रोक्तः । हि एतत् उत्तमम् रहस्यम्

मे माझा अस्मद् ष. ए. व.

भक्तः भक्त पु. प्र. ए. व.

सखा सखि पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

असि आहेस अस् धातू कर्तरि लट लकार म. पु. ए. व.

इति अव्यय

सः तो तद् पु. प्र. ए. व.

एव सुद्धा अव्यय

अयम हा इदम् पु. प्र. ए. व.

पुरातनः अनादि पुरातन पु. प्र. ए. व.

योगः योग पु.. ए. व.

अद्य आज अव्यय

मया माझ्या कडून अस्मद् तृ. ए. व.

ते तुला युष्मद् च. ए. व.

प्रोक्तः सांगितला आहे प्र+वच् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

हि म्हणून अव्यय

एतत् हे एतद् नपु. प्र. व.

उत्तमम् उत्तम नपु. प्र. ए. व.

रहस्यम् वाच्यता न करण्यासारखे रहस्य नपु. प्र. ए. व.

आधीच्या श्लोकात अव्यय अशा योगाचे ज्ञान काळाच्या ओघात लुप्त झाले असे सांगून झाल्यावर ह्या श्लोकात तेच ज्ञान श्रीभगवानकृष्णांना अर्जुनाला सांगण्याची इच्छा आहे. माता कुंती हि श्रीकृष्णाची आत्या. आतेमामेभावंडा पासून सुरू झालेल्या अर्जुन आणि श्रीभगवानकृष्णांचे अनेक प्रकारचे नाते आहे जसे सखा,सल्लागार, सारथी. 18 व्या अध्यायातील 64 व्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला तू मला अतिशय प्रिय आहेस असे म्हटले आहे. ज्याचे वर्णन संत ज्ञानेश्वरांनी अतिशय समर्पक शब्दात केले आहे. श्रीकृष्णांना अर्जुनाला  'आत्मज्ञान' द्यायचे आहे पण जणू काही त्यांना स्वतःशी उजळणी करायची आहे.  श्रीभगवानकृष्णांना अर्जुन इतका जवळचा आहे की त्यांनी आरशाची उपमा दिली आहे. आरसा पुन्हा पुन्हा स्वच्छ करणे म्हणजे स्वतःला सुधारित रूपात पाहण्याचा प्रयत्न करणे.

आरिसाचिया देखिलया। गोमटें कीजे धनंजया।

तें तया नोहे आपणया। लागीं जैसें।18.1347 ।।

पार्था, तुझे उगीच निमित्त करून मी आपल्याचकरिता बोलतो, तुझ्या आणि आमच्यामध्ये काही दुजेपणा आहे काय?

तैंसे पार्था तुझेनि मिषें। मई बोलें आपणयाचि उद्देशें।

माझ्या तुझ्या ठांई असे। मीतूंपण गा? 18.1348।।

ह्या पुरातन अशा ज्ञानाला रहस्य असे म्हटले आहे. म्हणजे फक्त काही लोकांना सांगण्यासारखे. आजच्या काळात फक्त पात्र व्यक्तींना सांगण्यासारखे ज्ञान अर्जुनाला सांगायला श्रीभगवानकृष्ण स्वतः उभे आहेत.

ह्या मध्ये एक महत्वाचा मुद्दा म्हणजे हे ज्ञान कर्मयोगी ला  सांगितले जाणार आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

तू माझा भक्त आणि प्रिय सखा आहेस म्हणून तुला मी हा प्राचीन योग सांगितला आहे, कारण हे उत्तम रहस्य आहे.

---

**अर्जुन उवाच**

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः। कथामेत्द्विजनियां त्वमादौ प्रोक्त्वनिति।।4.4।।**

अर्जुन उवाच - विवस्वतः जन्म परमं , भवतः जन्म अपरम् त्वम् आदौ एतत् प्रोक्तवान् इति कथम् विजानीयाम्

अर्जुन उवाच -

विवस्वतः सूर्यदेवाचा विवस्वत् पु. ष. ए. व.

जन्म जन्मन् नपु. प्र. ए. व.

परमं प्राचीन पर नपु. प्र. ए. व.

भवतः आपला भवत् पु. ष. ए. व.

जन्म जन्मन् नपु. प्र. ए. व.

अपरम् नजिक काळात अ+पर नपु. प्र. ए. व.

त्वम् तुम्ही युष्मद् प्र. ए. व.

आदौ प्रारंभी आदि पु. स. ए. व.

एतत् हे एतद् नपु. द्वि. ए. व.

प्रोक्तवान् सांगितले प्र+वच् धातू क्तवतु प्रत्यय पु. प्र. ए. व.

इति याप्रमाणे अव्यय

कथम् कसे अव्यय

विजानीयाम् जाणावे वि+ज्ञान धातू कर्तरि विधीलिङः उ. पु. ए. व.

आधीच्या 3 श्लोकांचे वर्णन ऐकल्यावर अर्जुनाने आता श्रीभगवानकृष्णांना प्रश्न विचारला आहे. अर्जुनाला श्रीकृष्णाची जन्मकथा माहीत आहे. श्रीकृष्ण, वासुदेव आणि देवकी चा पुत्र आहे हे त्याला माहीत आहे. सहाजिकच त्याला श्रीभगवानकृष्णांनी सूर्याला कसे काय अविनाशी ज्ञान दिले असा प्रश्न

पडला आहे. अर्जुनाचा प्रश्न जरी साधासुधा वाटला तरी त्याचे उत्तर मात्र प्रगल्भ असणार आहे. ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे विचारत आहे की

आपल्या जन्माच्या आधीपासून सूर्यदेवाचे अस्तित्व आहे, मग मी हे कसे मानू की आपण प्रथम त्यांना हे ज्ञान दिले होते?

----------------------------------------------------------------------------------------------------------

**श्री भगवानुवाच**

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन। तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परन्तप।।4.5।।**

श्रीभगवान्  उवाच - अर्जुन मे तव च बहूनि जन्मानि व्यतीतानि ; हे परन्तप! तानि सर्वाणि त्वम्  न वेत्थ अहम वेद

श्रीभगवान्  उवाच -

अर्जुन

मे माझे अस्मद् ष. ए. व.

तव तुझे युष्मद् ष. ए. व.

च सुद्धा अव्यय

बहूनि बरेच बहु नपु. प्र. ब. व.

जन्मानि जन्म जन्मन् नपु. प्र. ब. व.

व्यतीतानि होऊन गेले आहेत वि+अति+इ धातू जाणे क्त प्रत्यय नपु. प्र. ब. व.

हे परन्तप!

तानि ते तद् नपु. प्र. ब. व.

सर्वाणि सर्व सर्व नपु प्र. ब. व.

त्वम्  तुला युष्मद् प्र. ए. व.

न वेत्थ स्मरत नाहीत विद् धातू जाणणे कर्तरि लट लकार म. पु. ए. व.

अहम मी अस्मद् प्र. ए. व.

वेद जाणतो विद् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

पुनर्जन्मासंबंधी निरनिराळ्या धर्माच्या निरनिराळ्या कल्पना आहेत. काही जणांना पुनर्जन्म होतो हे मान्य नसते. त्यावर श्रीभगवानकृष्णांनी उघडपणे भाष्य केले आहे. त्याचे सविस्तर वर्णन पुढे येईलच. श्रीभगवानकृष्णांना अर्जुनाला ज्ञान द्यायची इच्छा आहे पण आतातरी तो सामान्य माणूसच आहे. त्यामुळे अर्जुनाला स्वतः च्या आधीच्या जन्मांची आठवण नाही. त्याउलट स्वतः योगेश्वर, त्यांना आपले आधीचे सर्व जन्म माहीत आहेत.

अपरिग्रहस्थैर्ये जन्मकथन्तासम्बोधः ॥पतंजली योगसूत्र 2.39 ।।

अपरिग्रहाची दृढता झाल्यास पूर्वजन्माचे ज्ञान होते असे महर्षी पतंजलींनी सुद्धा म्हटले आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे परन्तप अर्जुन! तुझे आणि माझे बरेच जन्म होऊन गेले आहेत. ते सर्व मला माहीत आहेत पण तू ते जाणत नाहीस.

-----------------------------------------------------------------------------------------------------------

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्। प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममयया।।4.6।।**

अजः अव्यय-आत्मा सन्  अपि , भूतानाम्  ईश्वरः सन् अपि, स्वाम्  प्रकृतिम्  अधिष्ठाय , आत्म-माया सम्भवमि ।

अजः न जन्मलेला अ+जः अज पु. प्र. ए. व.

अव्यय-आत्मा अविनाशी आत्मा अव्यय-आत्मन् पु. प्र. ए. व.

सन् असून सत पु. प्र. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

भूतानाम् सजीवांचा भूत पु. ष. ब. व.

---

ईश्वरः ईश्वर पु. प्र. ए. व.

ईश् धातू अधिकार असणे

सन् असून सत पु. प्र. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

स्वाम् स्वतः स्वा स्त्री. द्वि. ए. व.

प्रकृतिम् प्रकृतीला  प्रकृति स्त्री. द्वि. ए. व.

अधिष्ठाय अधीन होऊन अधि+स्था धातू ल्यप प्रत्यय

आत्म-माया आत्मशक्तीने आत्मन् माया स्त्री. तृ. ए. व.

सम्भवामि प्रकट होतो सम+भू धातू होणे कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

आता ह्या श्लोकात सामान्य माणसाचा पुनर्जन्म आणि ईश्वराचा अवतार ह्यामधे असणारा फरक सांगितला आहे. माणसे आपल्या कर्मफलानुसार पुढील जन्म घेतात. ईश्वराचा अवतार हि कल्पना मानवनिर्मितच. ईश्वराचे रूप, त्यांच्या जवळ असणारी शस्त्रे ही गुणवैशिष्ट्ये दर्शवतात. अजून तरी ईश्वराचे वृद्धावस्थेतील रूप कोणी साकारलेले नाही. कारण परमेश्वर म्हणजे चेतना शक्ती हे नकळत आपण मान्य केलेले आहे. परमेश्वराचे सगुण साकार आणि निर्गुण निराकार अशी दोन्ही रूपे आपण मानतो.

द्वे वव ब्राह्मणो रूपे मूरतं चैवामूर्तं च मर्त्यं चामृतं च स्थितं च यच्च सच्च त्यं च॥बृहद-आरण्यक 2.3.1।।

वस्तुतः ब्रह्म ची दोन रूपे आहेत. स्थूल आणि सूक्ष्म, नश्वर आणि अमर, सीमित असीमित, निश्चित आणि अनिश्चित.

ह्या श्लोकात माया शक्तीचा उल्लेख केला आहे. परमेश्वराचे सगुण साकार रूप आभासी आहे असेच काहीसे ह्या श्लोकात म्हटले आहे कारण स्वतःच निर्माण केलेल्या माया शक्ती तून मी प्रगट होतो असे म्हटले आहे.  माया म्हणजे अविद्या जी आपल्याला भूरळ पाडते त्याची सविस्तर माहिती पुढे वाचायला मिळेलच आणि दुसरी म्हणजे योगमाया किंवा आत्मिक शक्ती.

---

योऽसौ निर्गुण इत्युक्तः शास्त्रेषु जगदीश्वरः ।

प्राकृतैर्हेयसंयुक्तैर्गुणैर्हीनत्वमुच्यते ।पद्मपुराणम्/खण्डः 6 अध्यायः 227.श्लोक 40।।

परमेश्वराचे कोणतेही रूप नसते. प्राकृतिक शक्तींमुळे अशा रूपाची निर्मिती होते.

ह्या श्लोकात परमेश्वराची काही वैशिष्ट्ये सांगितली आहेत जसे अज, अव्यय आणि ईश्वर.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

---

जरी मी अजन्म असलो, अविनाशी असलो, सर्व भूतांचा ईश्वर असलो तरी प्रकृतीला वश करून माझ्याच आत्मशक्ती ने मी प्रकट होतो.

---

---

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽऽत्मानं सृजाम्यहम्।।4.7।।**

हे भारत! यदा यदा धर्मस्य ग्लानिः भवति, अधर्मस्य अभ्युत्थानम्, तदा हि अहम् आत्मानम् सृजामि।

हे भारत!

यदा यदा जेव्हा अव्यय

धर्मस्य धर्माला धर्म पु. ष. ए. व.

ग्लानिः क्षीणता ग्लानि स्त्री. प्र. ए. व.

ग्लै धातू म्लान होणे

भवति, होतो भू धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अधर्मस्य अधर्म पु. ष. ए. व.

अभ्युत्थानम् वृद्धि अभ्युत्थान नपु. प्र. ए. व. अभि+उद+स्था धातू

तदा तेव्हा अव्यय

---

हि कारण अव्यय

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

आत्मानम् स्वतः आत्मन् पु. द्वि. ए. व.

सृजामि प्रगट होतो सृज् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

आताच्या काळात आपण समजतो तो धर्म म्हणजे ज्याचा धर्मसंस्थापक असतो, ज्याचा धर्मग्रंथ असतो त्यात अर्थात काही विचारधारा मांडलेली असते. ह्या श्लोकातील धर्माचा अर्थ अगदीच वेगळा आहे. धर्म म्हणजे कर्तव्य. आपण आपल्या आयुष्यात बर्याच भूमिका निभावत असतो त्यातून कर्तव्ये निर्माण होत असतात. धृ म्हणजे धारण करणे ह्या पासून तयार झालेल्या ह्या शब्दाच्या भारतीय षड्दर्शनात निरनिराळ्या व्याख्या दिसून येतात.

धृति: क्षमा दमोऽस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रह:।

धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम्।। मनुस्मृति 6.92

धैर्य, क्षमा,संयम, अस्तेय, शुद्धि, इन्द्रिय निग्रह, बुदधिवर्धन, विद्यार्जन, सत्य आणि अक्रोध ही धर्माची 10 लक्षणे आहेत.

अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रह:। दानं दमो दया शान्ति: सर्वेषां धर्मसाधनम्।। (याज्ञवल्क्य स्मृति 1.122)

सत्यं दया तप: शौचं तितिक्षाेक्षा शमो दम: अहिंसा ब्रह्मचर्यं च त्यागः स्वाध्याय आर्जवम् ॥ 8॥
सन्तोष: समदृक्षसेवा ग्राम्येहोपरम: शनै:। नृणां विपर्ययेहक्षा मौनमात्मविमर्शम् ॥ 9 ॥

अनाद्यदे: संविभागो भूतेभ्यश्च यथार्थ:। तेष्वात्मदेवताबुद्धि: सुतरां नृषु पाण्डव ॥ 10 ॥

श्रवणं कीर्तनं चास्य स्मरणं महतां गते:। सेवायेवनतीर्दस्यं सख्यमात्मसमर्पणम् ॥ 11 ॥

नृणामयं परो धर्म: सर्वेषां समुदाहृत:। त्रिंशललक्षणवान् राजनसर्वात्मा येन तुष्यति ॥ 12 ॥श्रीमद्भागवतम् 7.11.8-12।। श्रीमद्भागवत मध्ये धर्माची 30 लक्षणे सांगितली आहेत.

आता ह्या श्लोकाचा अर्थ अगदीच सोपा आहे. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे भारत! जेव्हा जेव्हा धर्म क्षीण होतो आणि अधर्माची वृद्धि होते तेव्हा माझे साकार रूप प्रकट होते.

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।।4.8।।**

साधुनाम् परित्राणाय , दुष्कृताम् विनाशाय , धर्मसंस्थापना-अर्थाय च , (अहं) युगे युगे सम्भवामि

साधुनाम् सत्पुरुषांच्या साधु पु. ष. ब. व.

परित्राणाय संरक्षणासाठी परित्राण नपु. तृ. ए. व.

परि+त्रै धातू पालन करणे

दुष्कृताम् दुष्कर्म करणार्यांचा दुष्कृत  पु. ष. ब. व.

विनाशाय निःपात विनाश पु. च. ए. व.

धर्मसंस्थापना-अर्थाय धर्माचा जीर्णोद्धार करण्यासाठी धर्मसंस्थापना-अर्थाय पु. च. ए. व.

च सुद्धा अव्यय

युगे युगे प्रत्येक युगात युग नपु. स. ए. व.

सम्भवामि प्रकट होतो सम+भू धातू होणे कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

ह्या श्लोकातील साधू शब्दाचा अर्थ समजून घ्यायला हवा. साध् धातू +उण् (उ) = साधु । साधयति अयमिति साधुः ।संस्कृत मध्ये ह्याचा सामान्य अर्थ 'सज्जन व्यक्ति' असा आहे.   'साध्नोति परकार्यमिति साधुः'। लघुसिद्धान्तकौमुदी प्रमाणे साधू म्हणजे परोपकारी.

परमेश्वराच्या अवताराचे 6 प्रकार सांगितले आहेत.

1)पुरुष अवतार म्हणजे कारणोदकशायी विष्णु, गर्भोदकशायी विष्णु आणि क्षीरोदकशायी विष्णु.

2) लीला अवतार  ह्यामधे कुमारस, नारद, वराह, मत्स्य, यज्ञ, नर-नारायण, कर्दमी, दत्तात्रेय, हयासिरसा,  हंस, ध्रुवप्रिय या पृश्निगगर्भ,

ऋषभ, पृथु, नृमह, कूर्म  धन्वंतरि, मोहिनी, वामन, भार्गव, परशुराम, रामचन्द्र, व्यास, प्रलम्भरी, बलराम, कृष्ण, बुद्ध, कल्कि असे नमूद केले आहे.

3) गुण-अवतार याचे तीन प्रकार सात्विक गुण - भरणपोषण,

ब्रह्मा राजिक गुण-  सृजन

शिव तामस गुण- विनाश

4) मन्वन्तर अवतार  यज्ञ,

विभु, सत्यसेन, हरि, वैकुंठ,  अजिता, सार्वभौम, ऋषभ,  विश्वक्सेन, धर्म, सुधामा, योगेश्वर, बृहदभानु

5) युग अवतार  सत्य युग, 1,728,000 वर्षे,

त्रेता युग, 1,296,000 वर्षे,

द्वापर युग, 864,000 वर्षे,

कलियुग

6) शक्तिवेश अवतार जेव्हा परमेश्वर आपल्या विशिष्ट ऐश्वर्याचे प्रकटीकरण एखाद्या विशिष्ट व्यक्तीमत्वाद्वारे करतात नारदमुनी, राजा प्रीतु, वेदव्यास वगैरे.

आधीच्या श्लोकात धर्म ह्या शब्दाचा व्यापक अर्थ समजून घेतल्यानंतर साधू म्हणजे एकप्रकारे धर्मप्रसारक. त्याउलट असाधू माणसे धर्माचे शत्रू.

आपल्या आयुष्यात उद्भवलेल्या अडचणीत कोणीतरी अनपेक्षितरीत्या मदत करतात आणि आपण पट्कन म्हणून जातो अगदी देवासारखा भेटलास. परमेश्वराने ही सृष्टी निर्माण करून पंचमहाभूतांच्या माध्यमातून आपल्या भरणपोषणाची सोय केली. आता ह्या श्लोकात ते सज्जनांचे म्हणजे साधूंचे रक्षण करण्यासाठी स्वतः अवतार घेतात असे म्हटले आहे. ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की. सज्जनांचे रक्षण करण्यासाठी आणखी दुर्जनांचा विनाश करण्यासाठी तसेच धर्माच्या पुनः स्थापनेसाठी प्रत्येक युगात मी प्रकट होतो.

---------------------------------------------------------------------------------------------------------------

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः। त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन।।4.9।।**

हे अर्जुन ! एवम् यः मे दिव्यम् जन्म कर्म च तत्त्वतः वेत्ति , सः देहम्  त्यक्त्वा , पुनः जन्म न एति , माम् एति।

हे अर्जुन

एवम् अशा प्रकारे अव्यय

यः जै यद् पु. प्र. ए. व.

मे माझे अस्मद् ष. ए. व.

दिव्यम् दिव्य नपु. प्र. ए. व.

जन्म जन्मन् नपु. प्र. ए. व.

कर्म कर्मन् नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

तत्त्वतः अव्यय

वेत्ति जाणतो विद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

देहम्  देह नपु. द्वि. ए. व.

त्यक्त्वा त्यागल्यानंतर त्यज् धातू क्त्वा प्रत्यय

पुनः अव्यय

जन्म जन्मन् नपु. द्वि. ए. व.

न अव्यय

एति येत नाही इ धातू जाणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

एति येतो इ धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अर्जुनाने सुरवातीला श्रीभगवानकृष्णांना त्यांच्या जन्माबद्दल विचारले होते पण आधीच्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी त्यांच्या कर्माबद्दल सुद्धा सांगितले. माझा जन्म असा नसून माझे कर्म म्हणजे धर्मसंरक्षण, त्यासाठी  मी अवतार घेतो.

अद्वैतम् अच्युतम् अनादिम् अनंतरूपम् ।। ब्रह्मसंहिता 5.33।। परमेश्वराची अनेक रूपे आहेत पण तो एकच, अच्युत आणि अनादी आहे.

वेदाहमेतं पुरुषं महन्तमादित्यवर्णं तमसः परस्तात् | तमेव विदित्वातिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽन्याय ||श्वेताश्वतर उपनिषद् 3.8।।

मी त्या दिव्य शक्तीला जाणले आहे जी सूर्याप्रमाणे तळपत असते. हे सर्व पूर्णतः जाणणे हाच जीवन-मृत्यु च्या चक्रातून बाहेर पडण्याचा मार्ग आहे.

न काष्ठे विद्यते देवो न शिलायां न मृत्सु च।

भावे हि विद्यते देवस्तस्मात्भावं समाचरेत् ।।चाणक्यनीती 8.11।।

लाकुड, पाषाण किंवा मातीच्या बनविलेल्या मूर्तीत देव नसून तो जसा आपला भाव तसा असतो, त्यामुळे शुद्ध भाव हेच उपासनेचे खरं कारण (साधन) आहे.

सरतेशेवटी आपल्याला दैवत्वाची अनुभूती होणे हे आवश्यक. परमेश्वर कोणत्या रूपात आपल्यासमोर येईल हे तोच जाणे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे सांगत आहेत की

हे अर्जुन! अशाप्रकारे जो माझे दिव्य असे जन्म आणि कर्म तत्वतः जाणतो, त्याचा देहत्याग झाल्यावर पुनर्जन्म होत नाही. तो माझ्याशी एकरूप झालेला असतो.

---------------------------------------------------------------------------------------------------------

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिता:। बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागतः।।4.10।।**

वीत-राग-भय-क्रोधाः , मन्मयाः माम् उपाश्रिताः , ज्ञान-तपसा पूताः बहवः मतभावम् आगताः ।

वीत-राग-भय-क्रोधाः, राग क्रोध भय नष्ट झालेला वीत-राग-भय-क्रोधः पु. प्र. ब. व.

वी+इ धातू जाणे

रञ्ज धातू

भी धातू

क्रुध् धातू

मन्मयाः मला एकरूप झालेला मन्मय  पु. प्र. ब. व.

माम् माझ्या अस्मद् द्वि. ए. व.

उपाश्रिताः आश्रयास आलेला उप+श्रि धातू क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

ज्ञान-तपसा ज्ञानरूपी तप ज्ञान तपस् नपु. तृ. ए. व.

पूतः पवित्र होऊन पू धातू क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

बहवः अनेक बहु पु. प्र. ब. व.

मतभावम् माझ्यास्वरूपाला अस्मद् भाव पु. द्वि. ए. व.

आगताः प्राप्त झाले आहेत आ+गम् धातू जाणे क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

आपण धर्माची लक्षणे आधीच्या श्लोकात वाचली. त्याच्या विरुद्ध अधर्मी, तसे न होऊ देता, आत्म विकास साधण्याचा मार्ग ह्या श्लोकात सांगितला आहे. श्रीमद्भगवद्गीतेत नेहमीच मानसशास्त्रीय वर्णन अगदी चपखल केलेले आढळते. कोणताही व्यक्ती भौतिकवादी असेल तर तो कोणत्याही थराला जाऊ शकतो. म्हणजेच तो अधर्मी होऊ शकतो. आधीच्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे जर कोणताही व्यक्ती श्रीभगवानकृष्णांच्या अवतारा बद्दल जाणतो तो त्यांच्याशी एकरूप होतो असे म्हटले आहे.

सांगे पितळेची गंधिकाळिक । जे फिटली होय निःशेख ।

तैं सुवर्ण काई आणिक । जोडूं जाईजे ॥ ज्ञानेश्वरी 4.64 ॥

पितळेचे सर्व दोष काढून टाकले असता तेच सोने होईल. संत ज्ञानेश्वरांनी ह्या श्लोकाचे वर्णन अशा पद्धतीने केले आहे. आपण संतांना देवासमान मानतो कारण सर्व दैवी गुण त्यांनी त्यांच्या ठायी अंगिकारलेले असतात.

तस्य धीरेः परिजानन्ति योनिम्।तैत्तिरीय आरण्यक। 3.13.1।। परमेश्वराचे अवतार बुद्धिमान पुरुष जाणतात.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

राग भय क्रोध ह्यापासून पूर्णपणे मुक्त होऊन माझ्यात पूर्णपणे सामावले जाऊन, ज्ञानरूपी तपाने पवित्र असे बरेच माझ्याशी एकरूप झाले.

---------------------------------------------------------------------------------------------------------

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्। मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः।।4.11।।**

हे पार्थ ! ये माम् यथा प्रपद्यन्ते , अहम् तान तथा एव भजामि। मनुष्याः सर्वशः मम वर्तम् अनुवर्तन्ते ।

हे पार्थ !

ये जे यद् पु. प्र. ब. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

यथा जसे अव्यय

प्रपद्यन्ते शरण येतात प्र+पद् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

तान त्यांना तद् पु. प्र. ब.व.

तथा तसे अव्यय

एव नक्की अव्यय

भजामि भजतो भज् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

मनुष्याः माणसे मनुष्य पु. प्र. ब. व.

सर्वशः सर्व प्रकारे अव्यय

मम माझे अस्मद् ष. ए. व.

वर्त्म मार्गाचा वर्त्मन् नपु. द्वि. ए. व.

अनुवर्तन्ते अनुसरण करतात अनु+वृत् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

कृष्ण आणि त्याच्या आयुष्यातील निरनिराळ्या व्यक्ती अगदी पूतना पासून अर्जुनापर्यंत, श्रीभगवानकृष्णांचे अनेक रूपांत आपल्याला दर्शन घडते, त्याची हा श्लोक वाचल्यावर आठवण होते. अर्जुन आणि श्रीभगवानकृष्णांचे अनेक प्रकारचे नाते आहे. कर्मयोग ज्ञानयोग आणि भक्तीयोग ह्यापैकी कोणता योग श्रेष्ठ ह्याचे उत्तर ह्या श्लोकात मिळते.

अकाम: सर्वकामो वा मोक्षकाम उदारधी:।

तीव्रेन भक्तियोगेन यजेत पुरुषं परम् ॥ श्रीमद्भागवतम् 2.3.10॥

व्यापक बुद्धीमान व्यक्ती, भौतिकवादी किंवा सर्व कामनांचा त्याग केलेला, जर मोक्षाची अपेक्षा करत असेल तर त्याने पुरूषोत्तमाची पूजा करावी. श्रीभगवानकृष्णांना प्राप्त करण्यासाठी भक्तांना स्वतः बदलण्याची गरज नाही. ते ज्या स्वरूपात आहेत, ते जशी भक्ती करतात ती भगवंतांपर्यंत पोहोचते. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे पार्थ! जे भक्त मला जसे शरण येतात मी त्यांना तसाच अनुग्रह देतो. सर्वजण सर्व प्रकारे माझ्या मार्गाचे अनुकरण करतात.

---

**काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः। क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा।।4.12।।**

इह मानुषे लोके कर्मणाम् सिद्धिम्  काङ्क्षन्तः देवताः यजन्ते ; हि कर्मजा सिद्धिः क्षिप्रम् भवति ।

इह ह्या अव्यय

मानुषे मनुष्य मानुष पु. स. ए. व.

लोके लोकांत लोक पु. स. ए. व.

कर्मणाम् कर्मांच्या कर्मन् नपु. ष. ब. व.

सिद्धिम् फळांची सिद्धि स्त्री. द्वि. ए. व.

काङ्क्षन्तः इच्छा करणारे काङ्क्ष धातू शतृ प्रत्यय पु. प्र. ब. व.

देवताः देवतांना देवता स्त्री. द्वि. ब. व.

यजन्ते पूजतात यज् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

हि कारण अव्यय

कर्मजा कर्माची कर्मजा स्त्री. प्र. ए. व.

सिद्धिः सिद्धि स्त्री. प्र. ए. व.

क्षिप्रम् शीघ्र अव्यय

भवति होते भू धातू होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात कोणत्याही प्रकारची भक्ती परमेश्वराला मान्य होते मात्र ती पूर्ण शरणागती पत्करून केली पाहिजे असे म्हटले होते. योगाच्या मूळ हेतू पासून फारकत घेऊन आपण आपापल्या सोयीचे अर्थ काढून भक्ती करणे योग्य नाही असे सुचवणारा हा श्लोक.

नित्यो नित्यानां चेतानाश चेतानानाम।।श्वेताश्वतरोपनिषद्। 6.13।।हा नित्याचा नित्य आहे आणि चेतना शक्ती मधे चेतन आहे, ह्या तत्वाचा विसर पडून आपण आपल्या देवतांचे निरनिराळ्या विषयांत वर्गीकरण केले आहे, जसे बुद्धीची देवता गणपती. देवी हे शक्तीचे रूप मानले जाते. शिवाय लक्ष्मी म्हणजे समृद्धि. शनी म्हणजे न्यायदेवता. हनुमान म्हणजे शक्ती,निस्सीम भक्ती आणि स्वामीनिष्ठा. समर्थांनी 11 मारूतींची स्थापना केली. आणि मारूती उपासनेचा संदेश दिला. प्रत्येकाच्या मनात काही सुप्त इच्छा असतात. आपल्या अभिलाषा पूर्ण करण्यासाठी आपण सुयोग्य अशा देवतांची भक्ती करतो. जसे व्यापारी लोक मनोभावे लक्ष्मीपूजन करतात.

अतो माम् सुदुराध्यं हित्वान्यां भजते जनाः तत्स ता आशु-तोषेभ्यो लब्धा-राज्य-श्रीयोद्धताः

मत्तः प्रमत्त वर-दान विस्मयंती अवजानते। श्रीमद्भागवतम् 10.88.11।।

माझी भक्ती करणे कठीण वाटल्याने लोक इतर देवतांची पूजा करतात. आणि अपेक्षित फळे मिळवतात. पण त्यामुळे त्यांच्यात अहंकार आणि मोह निर्माण होतो आणि त्यांना देवतांचा सुद्धा विसर पडू लागतो.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की माणसे ह्या लोकात कर्मफळाची इच्छा ठेवून देवतांना पूजतात. कारण कर्मातून निर्माण होणारी सिद्धी येथे लगेचच प्राप्त होते.

---------------------------------------------------------------------------------------------------------------

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः। तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्।।4.13।।**

गुण-कर्म-विभागशः मया चातुर्वर्ण्यम्  सृष्टम् , तस्य कर्तारम्  अपि माम्  अव्ययम्  अकर्तारम्  विद्धि

गुण-कर्म-विभागशः गुण आणि कर्माच्या वर्गीकरणानुसार गुण-कर्मन्-विभागशः अव्यय

मया माझ्याकडून अस्मद् तृ ए. व.

चातुर्वर्ण्यम् चातुर्वर्ण चातुर्वर्ण्य नपु. द्वि. ए. व.

सृष्टम् रचले गेले सृज् धातू क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

तस्य त्याचा तद् नपु. ष. ए. व.

कर्तारम् कर्ता कर्तृ पु. द्वि. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

माम् मला अस्मद् द्वि . ए. व.

अव्ययम् अविनाशी अव्यय पु. द्वि. ए. व.

अकर्तारम् अकर्ता  न कर्तृ पु. द्वि. ए. व.

विद्धि समज विद् धातू जाणणे कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

खूप गहन विषया वर श्रीभगवानकृष्ण ह्या श्लोकात भाष्य करत आहेत. आपल्या आजुबाजूला निसर्गात बारकाईने पाहिले असता एक गोष्ट स्पष्टपणे दिसून येते. वृक्ष, वनस्पती पशुपक्षी ह्यांना सुद्धा भगवंतांनी काही कामे वाटून दिली आहेत. वनस्पतींचा औषधी गुणधर्म तर आहेच. फुलझाडांना सुगंध पसरवण्याचे काम दिले आहे तर अळू नोनी कर्दळीची झाडे जमीनीतील अतिरिक्त क्षार शोषून घेतात आणि मातीचा समतोल राखतात. तीच गोष्ट प्राण्यांची. कावळे गिधाडे आणि डुक्करे स्वच्छतेचे काम करतात. आता तर फक्त मिथेन वायूवर वाढणारे जिवाणू सुद्धा सापडले आहेत. निसर्गाचा समतोल

राखण्याची हि व्यवस्था भगवंतांनीच निर्माण केली आहे. अशीच व्यवस्था त्यांनी चातुर्वर्णाच्या रूपात माणसांसाठी केली आहे असे म्हटले तर काहीच चूक नाही.ज्याने जसे काम करणे अपेक्षित होते तशीच त्याच्याकडे कौशल्ये सुद्धा निर्माण झाली. सुदैवाने प्राणी आणि वनस्पतींच्या जगात त्यांच्या कामावरून जेष्ठ कनिष्ठ असे काही नसते. माणसांनी मात्र ह्याचा विपर्यास केला. माणसामध्ये असणारे गुण आणि कर्माच्या प्रतवारी नुसार चातुर्वर्णाची निर्मिती झाली. चातुर्वर्णाचा संबंध त्रिगुणांशी आहे, जन्माशी नाही हे आवर्जुन सांगितले आहे. पुढे श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की ह्या सृष्टिचा रचयिता तेच पण तरीही ते अकर्ता आहेत. ह्याचा अर्थ कसा लावायचा? ह्याचे दोन पर्याय समोर येतात. जसे आपण म्हणतो मी बस मध्ये बसले आणि दुसऱ्या गावी पोहोचले ( मला बसचालकाने एका ठिकाणाहून दुसरीकडे पोहोचवले.) म्हणजेच माझ्यातील गुण-कर्मामुळे मला वर्ण मिळाला. तसेच श्रीभगवानकृष्ण सृष्टी-कर्ता आहेत तरीही अकर्ता आहेत.  दुसरे म्हणजे ते कर्ता असले तरी कर्मबंधनात अडकलेले नाहीत म्हणून ते अकर्ता आहेत. कोणी म्हणून ठेवले आहे.

जिभेविण आत्मा न बोले परी त्याच्या सत्तेने ती जीभ हाले। शब्द शब्द जे जे निघाले। ते आत्मसत्तेने। आत्मा अबोलणा स्वये। परि तोचि बोलतो म्हणावा निश्चये।।

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

गुण आणि कर्माच्या वर्गीकरणानुसार माझ्याकडून चार वर्णाची निर्मिती झाली आहे. त्याचा कर्ता मी असलो तरी मी अकर्ता आणि अपरिवर्तनीय आहे हे तू समजून घे.

---------------------------------------------------------------------------------------------------------

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले सृहा। इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते।।4.14।।**

कर्म-फले मे स्पृहा न मम  कर्माणि न लिम्पन्ति । इति यः मामृ अभिजानाति , सः कर्मभिः न बध्यते

कर्म-फले कर्मफळाची कर्मन् फल नपु. स. ए. व.

मे माझी अस्मद् ष. ए. व.

स्पृहा स्पृहा स्पृहा स्त्री. प्र. ए. व.

न अव्यय

मम मला अस्मद् द्वि. ए. व.

कर्माणि कर्मे कर्मन् नपु. प्र. ब. व.

न

लिम्पन्ति लिप्त करतात लिप् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

इति म्हणून अव्यय

यः जो यद् पु. प्र. ए. व.

माम मला अस्मद् द्वि. ए. व.

अभिजानाति तत्वतः जाणतो अभि +ज्ञा धातू जाणणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

कर्मभिः कर्मांनी कर्मन् नपु. तृ. ब. व.

न अव्यय

बध्यते बांधले जातो बन्ध् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

योगेश्वर श्रीभगवानकृष्ण महान कर्मयोगी आहेत हे सांगणारा हा श्लोक. आधीच्या श्लोकात त्याचे सूतोवाच केले आहेच. कर्मयोगी ची लक्षणे सांगताना आपण आपले कर्म कसे करायचे ते सांगणारा हा श्लोक. 7 व्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे जेव्हा गरज असेल तेव्हाच श्रीभगवानकृष्ण साकार होतात. एरव्ही निराकार असल्याने त्यांचा देहच नाही, अहंकारही नाही. त्यांना कर्माचा स्पर्श सुद्धा होत नाही. आणि  कर्मफळाची अपेक्षा सुद्धा नाही. असेच काहीसे आपल्याला दिसून येते. अग्नी मध्ये हवी टाका नाहीतर केरकचरा, तो त्याचे काम चोख करणार. सूर्याची किरणे पवित्र अपवित्र भूमीवर सारखीच पडणार.

म्हणून ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

कर्मांचे माझ्यावर शिंतोडे उडत नाहीत ना कर्मफळाची मला स्पृहा आहे. हे असे मला जे तत्वतः जाणतात ते सुद्धा कर्मबंधनात अडकत नाहीत.

---

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः। कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम्।।4.15।।**

पूर्वैः मुमुक्षुभिः अपि एव म  ज्ञात्वा कर्म कृतम् । तस्मात् त्व पूर्वैः पूर्वतरम्  कृतम् कर्म एव कुरु ।

पूर्वैः पूर्वीचे पूर्व पु. तृ ब. व.

मुमुक्षुभिः मोक्ष प्राप्त मुमुक्षु पु. तृ ब. व.

अपि सुद्धा अव्यय

एवम  अशाप्रकारे अव्यय

ज्ञात्वा जाणून ज्ञा धातू क्त्वा प्रत्यय

कर्म कर्म कर्मन् नपु. द्वि. ए. व.

कृतम् केले कृ धातू क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

तस्मात् म्हणून तद् पु. पं. ए. व.

त्वम् तू युष्मद् प्र. ए. व.

पूर्वैः पूर्वजांद्वारे पूर्व पु. तृ ब. व.

पूर्वतरम् पूर्वापार पूर्वतर नपु. प्र. ए. व.

कृतम् केले गेलेले कृ धातू क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

कर्म कर्म कर्मन् नपु. द्वि. ए. व.

एव सुद्धा अव्यय

कुरु कर कृ धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात कर्मयोगीची लक्षणे सांगितली आणि आता ह्या श्लोकात पूर्वीच्या मुमुक्षु लोकांचे दाखले दिले आहेत. मागील पिढीचे कर्तृत्व स्मरण करून त्याच्या पासून बोध घेण्याची परंपरा तेव्हापासून होती असे दिसते. परमेश्वराचे अकर्तृत्व आणि अभोक्तृत्व असे स्वरूप जाणून घेतल्यानंतर सहाजिकच परमेश्वराला जोडून घ्यायचे, म्हणजे आत्म्यानेही असेच गुण अंगी बाळगायचे हे मोक्षेच्छु लोकांनी

समजून घेऊन तसेच कर्म केले. हिच परंपरा कायम ठेव असे श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला सांगत आहेत. ते ह्या श्लोकात असे म्हणतात की

पूर्वीच्या मोक्षप्राप्त लोकांनी सुद्धा असे सर्व जाणून कर्म केले म्हणून तू सुद्धा पूर्वापार चालत आलेल्या या पद्धतीने कर्म कर.

------------------------------------------------------------------------------------------------------------

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः। तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्।।4.16।।**

'किम्  कर्म , किम् अकर्म ' इति अत्र कवयः अपि मोहिताः । तत् कर्म ते प्रवक्ष्यामि , यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे

किम् काय किम् नपु. प्र. ए. व.

कर्म कर्मन् नपु. प्र. ए. व.

किम् अकर्म काय अकर्म नपु. प्र. ए. व.

इति अव्यय

अत्र येथे अव्यय

कवयः कवी कवि पु. प्र. ब. व.

अपि सुद्धा अव्यय

मोहिताः मोहवतात मुह् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

तत् ते तद् नपु. द्वि. ए. व.

कर्म कर्मन् नपु

ते तुझे युष्मद् च. ए. व.

प्रवक्ष्यामि सांगतो प्र+वच् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

यत् जे यद् नपु. द्वि. ए. व.

ज्ञात्वा जाणून ज्ञा धातू क्त्वा प्रत्यय

अशुभात् अशुभ (कर्म बंधनातून) अशुभ पु. पं. ए. व.

मोक्ष्यसे मुक्त होशील मुच् धातू कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

कर्मयोगी श्रीभगवानकृष्णांनी कर्म आणि कर्मफळाची आसक्ती असू नये हे पूर्वजांचे दाखले देऊन सांगितले. पण मुळात कर्म चांगले किंवा वाईट हे कसे ठरवायचे. श्रीमद्भगवद्गीता निर्माण होण्याचे हेच तर मुख्य कारण आहे. अर्जुनाला युद्ध करणे आपल्याच प्रियजनांना मारणे अतिशय चुकीचे वाटते आहे. आणि श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला युद्ध करण्यास प्रवृत्त करत आहेत. धर्मं तु साक्षाद्भगवत्प्रणीतं न

वै विदर्ऋष्यो नापि देवाः ।।

श्रीमद्भागवतम्-6.3.19।। यमराज असे म्हणत आहेत की धार्मिक सिद्धांत परमेश्वरानेच निर्माण केले उचित आणि अनुचित कर्म ठरवणे हे ऋषी आणि देवतांसाठी कठीण आहे. एखादे झाड गोड फळे देऊन इतरांची भूक भागवते तर एखाद्या झाडाची फळे विषारी असतात. एखादे कडू फळ औषधी असू शकते. वाघ सिंह शिकार केल्याशिवाय जगूच शकणार नाहीत मग त्यांना हिसक म्हणायचे का? 'मौनं सर्वार्थ साधनम्', कधीकधी बोलण्याचे टाळणे जास्त फायदेशीर ठरू शकते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

कर्म काय आणि अकर्म काय हे ठरवणे विद्वानांसाठी सुद्धा बुचकळ्यात पाडणारे आहे. म्हणून मी तुला त्या कर्माबद्दल सांगेन जे जाणून घेतल्यानंतर तुला अशुभ कर्म बंधनातून मुक्ती मिळेल.

------------------------------------------------------------------------------------------------------------

**कर्मणो ह्यपि बोध्द्यं बोध्व्यं च विकर्मणः। अकर्मणश्च बोधव्यं गहना कर्मणो गतिः।।4.17।।**

कर्मणः बोधव्यम् , विकर्मणः च अपि बोधव्यम् , अकर्मणः च बोधव्यम्, हि कर्मणः गतिः गहना।

कर्मणः कर्म तत्व कर्मन् नपु. ष. ए. व.

बोधव्यम् जाणले पाहिजे बुध् धातू तव्यत प्रत्यय नपु. प्र. ए. व.

विकर्मणः विशेष कर्म तत्व वि+ कर्मन् नपु. ष. ए. व.

च सुद्धा अव्यय

अपि सुद्धा अव्यय

बोधव्यम् जाणले पाहिजे बुध् धातू तव्यत प्रत्यय नपु. प्र. ए. व.

अकर्मणः अकर्माचे तत्व अ+कर्मन् नपु. ष. ए. व.

च सुद्धा अव्यय

बोधव्यम्, जाणले पाहिजे बुध् धातू तव्यत प्रत्यय नपु. प्र. ए. व.

हि कारण अव्यय

कर्मणः कर्माची कर्मन् नपु. ष. ए. व.

गतिः मार्ग गति स्त्री. प्र. ए. व.

गहना अवघड गहना स्त्री. प्र. ए. व.

पाणी वाहते असेल तर त्याची नदी होईल. ते एकाजागी साचून राहिले तर जमिनीत जास्त मुरेल आणि विहीरीचे पाणी वाढेल. कर्म च्या विरूद्ध अकर्म. मग पाण्याचे कर्म आणि अकर्म कसे ठरवायचे? खरोखरच भल्याभल्यांना कर्म आणि अकर्म ह्याचा फरक करणे अवघड वाटते. "कर्म अज्ञेय आहे."संन्यासी करतात त्याला अकर्म म्हणायचे की कसे? आळशी लोक आणि संन्यासी ह्यांच्यात नक्की फरक काय?असे अनेक प्रश्न सामान्य माणसाला पडतात. कर्मयोगाचे अंतिम लक्ष्य मुक्ती हेच आहे.

वि उपसर्ग लावून तयार झालेला शब्दाचा अर्थ विशेष कर्म असाही घेता येईल.

विहीत कर्म निषिद्ध कर्म कर्म शून्यता असे निरनिराळे कर्माचे प्रकार, हळूहळू आपल्याला त्याचे अर्थ उलगडत जाणार आहे.

तरी कर्म म्हणजे स्वभावे। जेणे विश्वाकार संभवे। ते सम्यक आधी जाणावे। लागे येथ।।ज्ञानेश्वरी 4.89।।

संत ज्ञानेश्वरांनी ह्या श्लोकाचे वर्णन करताना 4 ओवी (89-92)रचल्या आहेत. पहिल्या ओवीत ते विश्वाची निर्मिती हे सुद्धा एक कर्म असे म्हणतात.

तावत कर्माणि कुर्विता न निर्विद्येत यावत मत्-कथा- श्रवणादौ वा श्रद्धा यवन न जायते ।। श्रीमद्भागवत। 11.20.9।।

मनुष्याने तोपर्यंत आपल्या नियत कर्तव्याचे पालन केले पाहिजे, जोपर्यंत कर्मांचा त्याग करावासा वाटून माझ्याविषयी श्रद्धा उत्पन्न होणार नाही.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

(शास्त्रांनी निर्दिष्ट केलेल्या ) कर्माबद्दल जाणून घेतले पाहिजे तसेच अकर्म आणि विकर्म ह्याबद्दल सुद्धा जाणून घ्यायला हवे. कर्माचा मार्ग तसा खडतरच आहे.

-----------------------------------------------------------------------------------------------------------

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः। स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्।।4.18।।**

यः कर्मणि अकर्म यः च अकर्मणि कर्म पश्येत् सः मनुष्येषु बुद्धिमान् , सः युक्तः कृत्स्न-कर्म-कृत् ।

यः जो यद् पु. प्र. ए. व.

कर्मणि कर्मात कर्मन् नपु. स. ए. व.

अकर्म न कर्म नपु. द्वि. ए. व.

यः जो यद् पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अकर्मणि अकर्मात न कर्मन् नपु. स. ए. व.

कर्म कर्म नपु. द्वि. ए. व.

पश्येत् पाहतो दृश् धातू विधीलिङः प्र. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

मनुष्येषु समाजातील मनुष्य पु. स. ब. व.

बुद्धिमान्, बुदधिमत् पु. प्र. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

युक्तः पात्र युज् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

कृत्स्न-कर्म-कृत् समस्त कर्मांशी संलग्न कृत्स्न-कर्मन् कृत्  पु. प्र. ए. व.

एखादी गोष्ट मिळवण्यासाठी ज्या ज्या गोष्टी कराव्या लागतात ते कर्म,जे कर्त्याच्या इच्छेवर अवलंबून असते. जी गोष्ट मिळवायची, त्या पेक्षा मी निराळा आहे असे वाटत असल्याने कर्ता, कर्म करत असतो. म्हणजे हे सर्व अभिमानापोटी घडते असे म्हणता येईल. हे सांगताना संत ज्ञानेश्वर खूप चांगले उदाहरण देतात.

आणि उदोअस्ताचेनि प्रमाणे। जैसें न चलतां सूर्याचें चालणें। तैसें नैष्कर्म्यत्व जाणें। कर्मीचि असतां ॥4.99॥ सूर्य उगवला आणि मावळला असे आपल्याला वाटते. प्रत्यक्षात सूर्य काहीच करत नाही. म्हणजेच अकर्म म्हणजे फलरहीत कर्म असे म्हणता येईल. ज्याला आपण कर्म समजतो तो कर्मभाव आहे आणि ज्याला आपण कर्मभाव असे समजतो ते कर्म आहे हेच तर श्रीभगवानकृष्णांना सांगायचे आहे.

जो सकळ कर्मी वर्तता। देखे आपुली नैष्कर्म्यता। कर्मसंगें निराशता। फळाचिया।। ज्ञानेश्वरी 4.93॥

जो कर्म करत असताना आपण कर्म करत नाही हे जाणतो आणि कर्मफळाची अपेक्षा सुद्धा करत नाही. (असा तो सूर्य) आता अकर्म आणि निष्क्रियता ह्यामध्ये काहीही संदेह उरला नाही. अकर्माचा संबंध आता फक्त आत्म्याच्या ज्ञानाशी आहे. 2र्या अध्यायात आत्मा अविनाशी अपरिवर्तनीय अनाकलनीय अप्रकट आहे असे सर्व वाचले आहेच. नाशवंत कर्मांची इच्छा संपून अविनाशी अशा कर्माच्या मार्गावर वाटचाल सुरू करणाऱ्या योगीची 'बुद्धिमान्', ' युक्तः' आणि 'कृष्णकर्मकृत' अशी स्तुती केली आहे. आता 15 व्या श्लोकाचा संदर्भ लागतो आहे. राजा जनकाचे उदाहरण येथे देता येईल. सिंहासनावर बसून राज्य करता करता जनक हा ज्ञानी पुरुष होता.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

जो कर्मामध्ये अकर्म आणि अकर्मामधे कर्म पाहतो तो बुद्धिमान आहे, तो सर्व कर्मांचा कर्ता आहे.

---

**यस्य सर्वे समारंभः कामसंकल्पवर्जिताः। ज्ञानाग्निघकर्माणं तमहुः पण्डितं बुधाः।4.19।।**

यस्य सर्वे समारंभः काम-संकल्प-वर्जिताः , ज्ञान-अग्नि-दग्ध-कर्मणाम् तम्  बुधः पण्डितम्  आहुः

यस्य ज्याचे यद् पु. ष. ए. व.

सर्वे सर्व पु. प्र. ए. व.

समारंभाः उपक्रम समारंभ पु. प्र. ए. व.

सम+आ+रभ् धातू आनंदी होणे

काम-संकल्प-वर्जिताः कामना आणि संकल्प पासून वर्ज्य काम-संकल्प-वर्जित पु. प्र. ए. व.

व्रज् धातू त्याग करणे ज्ञान-अग्नि-दग्ध-कर्मणाम् ज्ञानरूपी अग्नी मध्ये खाक झालेले ज्ञान-अग्नि-दग्ध-कर्मन् पु.  द्वि. ए. व.

तम् त्याला तद् पु. द्वि. ए. व.

बुधः ज्ञानी बुध धातू जाणणे पु. प्र. ब. व.

पण्डितम् पण्डित पु. द्वि. ए. व.

ज्ञा धातू जाणणे. प्रज्ञा प्रज्ञित म्हणजे निपुण कुशल

आहुः म्हणतात ब्रु धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

रूढ अर्थाने अग्नी म्हणजे आग. भारतीय तत्त्वज्ञानाप्रमाणे आपल्या शरीरात अग्नीचे प्रकार सांगितले आहेत. जसे जठराग्नी जो अन्न पचन करण्यास मदत करतो. पाणी आणि वायू यापासून मिळणारी आणि सौर उर्जा आपल्याला माहीत आहेच त्याला म्हणायचे भूताग्नी. आणि निरनिराळ्या धातू पासून मिळणारी ऊर्जा म्हणजे धत्वाग्नी. कामाग्नी बद्दल वेगळे बोलायची गरज नाही. योगी जी कठोर तपश्चर्या करतात तोसुद्धा अग्नीचाच प्रकार. शंकर महादेवांनी कठोर तप केल्यानंतर त्यांच्या शरीरातून जो घाम वाहू लागला त्यापासून नर्मदा नदीचा प्रवाह निर्माण झाला अशी आख्यायिका आहे. ह्या श्लोकात प्रखर ज्ञानाला अग्नी ची उपमा दिली आहे.

ह्या श्लोकात बुधा आणि पण्डित अशी दोन विशेषणे वापरली आहेत. दोन्ही चा अर्थ ज्ञानवंत पण त्याच्या छटा वेगवेगळ्या आहेत.

---

पण्डित म्हणजे एखाद्या विषयाचे विशेष ज्ञान असलेला, ज्याला वेद शास्त्र ह्याचे ज्ञान आहे असा प्रज्ञावंत. त्याच प्रमाणे गुरू चा अर्थ अंधकार (अज्ञान) नष्ट करणारा. कबीरांनी गुरु ची चार लक्षणे सांगितली आहेत. बुध बोधति बुद्ध ज्याला आत्मज्ञान झाले आहे. असा बुद्ध ज्याने आपल्यातले दोष संपवले आहेत, त्याला आपल्या क्षमतांची जाणिव झाली आहे असा. बुद्ध होणे. कोणत्याही तंत्रज्ञानाचा विवेकी उपयोग करायचा कि अतिरेकी उपयोग ह्याचे भान आपल्याकडे असलेले ज्ञान आणि आपली विवेकबुद्धी ह्यामुळेच येते. अणूबॉंब की अणूऊर्जा हे आपण आपल्या सदविवेकानेच ठरवतो. विवेकबुद्धी ला ज्ञानाची जोड असावीच लागते.

आपल्या बिनचूक ज्ञानाच्या, आणि आत्मज्ञानाच्या जोरावर जो आपले कर्म करतो त्याच्या मनात आता कसलीही शंका नाही, (आधीच्या श्लोकांचे संदर्भ घेऊन) जे काही करायचे आहे त्यात फक्त समर्पणाची भावना आहे अशा ज्ञानी माणसालाच पंडित म्हणतात

आता पर्यंतच्या श्लोकांचे सार म्हणजे हा श्लोक. आता ज्ञानप्राप्ती झाली आहे. आणि सर्व कर्मे आशाविरहीत आहेत. कर्मयोगीची सर्व कामे संकल्प आणि कामना ह्या शिवायच होतात. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

ज्याचे समस्त कार्य आणि कर्म कामनांपासून मुक्त आहे, ज्याचे समस्त कर्म ज्ञानरूपी अग्नीत भस्म झाले आहे त्याला आत्मज्ञानी बुद्धीमान असे म्हणतात.

---

**त्यक्त्वा कर्मफलसाङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः। कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चितक्रोति सः।4.20।।**

कर्म-फल-आसङ्ःगम्  त्यक्त्वा निराश्रयः नित्य-तृप्तः , सः कर्माणि अभिप्रवृत्तः अपि किञ्चित्  न करोति एव

कर्म-फल-आसङ्ःगम् कर्म फळाची आसक्ती

कर्मन् फल आसङ्ग पु. द्वि. ए. व.

त्यक्त्वा त्याग करून त्यज् धातू क्त्वा प्रत्यय

निराश्रयः आश्रयाची अपेक्षा न ठेवता निर आश्रय पु. प्र. ए. व.

नित्य-तृप्तः सदैव संतुष्ट नित्य तृप्त पु. प्र. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

कर्माणि कर्मात कर्मन् नपु. स. ए. व.

अभिप्रवृत्तः संलग्न राहून अभिप्रवृत्त पु. प्र. ए. व.

वृत् धातू ग्रहण करणे.

अपि सुद्धा अव्यय

किञ्चित्  काहीही किम् चित् नपु. द्वि . ए. व.

न अव्यय

करोति करतो कृ धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

एव सुद्धा अव्यय

बुद्धिवंताला ज्ञानाने तृप्ती मिळते तर उपाशी माणसाला भोजनाने. मग योगी माणसाला कशामुळे तृप्तता मिळत असावी? नित्यतृप्ती हा शब्द बरेच काही सांगून जातो. सामान्य माणसे काम करतात ते स्वतःच्या अपेक्षापूर्ती साठी. त्या कामाची पावती मिळावी असे त्यांना वाटत असते. त्यासाठी ते व्यावसायिक संबंध जोडून असतात. त्या अर्थाने ते एकमेकांचे आश्रित असतात. योगी चे जगच निराळे. एका गाण्यात म्हटल्या प्रमाणे कबीराचे विणतो शेले कौशल्येचा राम. कबीर रामभक्ती मध्ये इतके बुडून गेले आहेत की जणूकाही शेले विणण्याचे काम रामच करत आहेत.

नित्यतृप्ती ही अवस्था योगीने महत्प्रयासाने मिळवलेली आहे. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की कर्तेपणाची भावना आणि कर्मफळाचा त्यागी, ज्याला काहीही साध्य करायचे नसल्याने कोणावरही अवलंबून नाही असा, कर्माशी संलग्न असूनही काहीच करत नाही.

---

**निराशीर्यत्चित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः। शरीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्।।4.21।।**

निर आशीः त्यक्त-सर्व-परिग्रहः यत-चित्त-आत्मा , केवलम्  शारीरम्  कर्म कुर्वन्  किल्बिषम् न अप्नोति ।

निर आशीः आसक्ती रहीत निर् आशिस् स्त्री.प्र. ए. व.

त्यक्त-सर्व-परिग्रहः सर्व भोगवस्तूंचा त्याग केलेला त्यक्त-सर्व-परिग्रह पु. प्र. ए. व.

यत-चित्त-आत्मा शरीर आणि मन जिंकलेला यत-चित्त-आत्मन् पु. प्र. ए. व.

केवलम् केवल नपु. द्वि. ए. व.

शारीरम्  शरीरसंबंधी शारीर नपु. द्वि. ए. व.

कर्म कर्म कर्मन् नपु. द्वि. ए. व.

कुर्वन् करणारा कृ धातू शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

किल्बिषम् पाप किल्बिष नपु. द्वि. ए. व.

न अप्नोति प्राप्त होत नाही आप् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

भारतीय तत्वज्ञानात कर्माचे अनेक प्रकार सांगितलेले आहेत. श्रीमद्भगवद्गीतेतच वाचिक कायिक मानसिक, तसेच सात्त्विक राजसि आणि तामसी असे कर्माचे प्रकार सांगितलेले आहेत.

ह्याव्यतिरिक्त कर्मांचे असेही वर्गीकरण करता येईल

1. नित्य कर्म (दैनिक कार्य)

2. नैमित्य कर्म (विशिष्ट प्रसंगानुरूप केलेले कार्य)

3. काम्य कर्म (विशिष्ट हेतूपुरस्सर केलेले कार्य)

4. निष्काम कर्म (कोणत्याही फलाची अपेक्षा न ठेवता केलेले कार्य)

5. संचित कर्म (पूर्व जन्मीच्या संचितामुळे निर्माण झालेले कर्म

6. निषिद्ध कर्म

एखाद्या योगीने निस्पृहता आणि आत्मसंयम अंगिकारली असेल पण त्याने देहाची हेळसांड करणे अपेक्षित नाही. जिवंत समाधी आणि जीवन समाप्ती ह्या बद्दल भारतीय तत्त्वज्ञानात काय लिहिले आहे ते शोधायला हवे. पण एक महत्त्वाचा फरक असा की जेव्हा आसक्ती रहीत असे योगीचे जीवन असेल

तेव्हा त्याला कसलेही दुःख, अपेक्षाभंग होत नाही पण ईश्वरप्राप्ती चा सुप्त आनंद मात्र होत असतो. जीवनाला कंटाळून संपवलेले आयुष्य आणि जीवन समाधी ह्यात हाच मोठा फरक आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की जो आशाविरहीत आहे, ज्याने मन आणि शरीरावर ताबा मिळवला आहे. कोणत्याही भोग वस्तूंचा संग्रह न करता त्यांचा त्याग केला आहे अशा व्यक्तीला शारीरिक कर्म केल्याचे पाप लागत नाही.

------------------------------------------------------------------------------------------------------------

**यदृच्छलाभासन्तुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सरः। समः सिद्धवसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते।।4.22।।**

यदृच्छा लाभ-सन्तुष्टः द्वन्द्व-अतीतः विमत्सरः सिद्धौ असिद्धौ च समः कृत्वा अपि न निबध्यते

यदृच्छा लाभ सन्तुष्टः विनासायास लाभाने संतुष्ट होणारा यदृच्छा लाभ सन्तुष्ट पु. प्र. ए. व.

ऋ धातू प्राप्त करणे द्वन्द्व-अतीतः दुविधा पासून मुक्त द्वन्द्व-अतीत पु. प्र. ए. व.

अती+त ई धातू जाणे

विमत्सरः ईर्ष्या रहीत विमत्सर पु. प्र. ए. व.

मद् धातू प्रसन्न होणे

सिद्धौ यशात सिद्धि स्त्री. स. ए. व.

असिद्धौ अपयशात अ सिद्धि स्त्री. स. ए. व.

च सुद्धा अव्यय

समः स्थिर सम पु. प्र. ए. व.

कृत्वा कृ धातू क्त्वा प्रत्यय

अपि सुद्धा अव्यय

न अव्यय

निबध्यते बद्ध होत नाही नि+बन्ध् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

---

आपली एखाद्या गोष्टीवरची मते कधी नकारात्मक कधी सकारात्मक अशी बदलत राहतात त्यालाच वैचारिक किंवा भावनिक द्वंद्व असे म्हणतात. अशा परिस्थितीत समत्व राखणे खूप महत्वाचे. ज्या बद्दल 12 व्या अध्यायात  खूपच विस्ताराने सांगितले आहे. त्याचीच एक झलक ह्या श्लोकात. आधीच्या श्लोकात योगी फक्त जीवंत राहण्यासाठी शारीरिक कर्म करतो असे आपण वाचले. अशा परिस्थितीत त्याला जर काही अचानक लाभ झाला तर तो कसा वागेल त्याचे विवेचन.

ईशावास्योपनिषदातील  श्लोकात असेच वर्णन केले आहे.

यस्मिन्सर्वाणि भूतानि आत्मैवाभूद्विजानातः |

तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः || ईशावास्योपनिषद 7 ||

ज्याच्या ठिकाणी सर्व भूत मात्रे स्वतः च्या आत्म्यामधे एक होतात अशा ज्ञात्याला मग भ्रान्ती कसली? जो सर्व ठिकाणी एकत्व पाहतो त्याला दुःख कसले?

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जो योगी (कसल्याही कर्मफळाची अपेक्षा नसलेला) आपोआप मिळणाऱ्या गोष्टींमध्ये संतुष्ट आहे, सर्व इच्छा रहीत, द्वंद्वापासून दूर, यश अपयश एकाच तराजूत तोलणारा, कोणत्याच कर्माने बांधला जात नाही.

---

**गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानवस्थितचेतसः।यज्ञयाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते।।4.23।।**

गत-सङ्गस्य मुक्तस्य ज्ञान-अवस्थित-चेतसः यज्ञाय आचरतः समग्रम् कर्म प्रविलीयते ।

गत-सङ्गस्य भौतिक विषयक संग नाहिसा झालेल्या चे

गत-सङ्ग पु. ष. ए. व.

मुक्तस्य सर्व बंध मुक्त मुच् धातू क्त प्रत्यय नपु. ष. ए. व.  ज्ञान-अवस्थित-चेतसः चित्त परमात्म्याच्या ज्ञानात स्थिर असलेला ज्ञान-अवस्थित-चेतस् नपु. ष. ए. व.

अव+स्था धातू

यज्ञाय यज्ञासाठी यज्ञ पु. च. ए. व.

आचरतः आचरण करणारा आचरन् नपु. ष. ए. व. आ चर धातू

समग्रम् सर्व समग्र नपु. द्वि. ए. व.

कर्म कर्मन् नपु. द्वि. ए. व.

प्रविलीयते विलीन होतात

प्र +वि+ली धातू विरघळून जाणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आपण बऱ्याच व्यक्तींना जसे  आधुनिक संत असे संबोधतो त्याचा यथार्थ अर्थ समजावून सांगणारा हा श्लोक. 3र्या अध्यायातील 9 व्या श्लोकात आपण यज्ञ ह्या शब्दाचा अर्थ विस्ताराने समजून घेतला, आपले कर्म आपण यज्ञ समजून केले पाहिजे असे त्या श्लोकात सांगितले होते. गाडगेबाबांच्या कार्याची ह्या श्लोकाच्या निमित्ताने आठवण झाली. कर्मयोगा संबंधित श्लोकातील हा सर्वात महत्त्वाचा श्लोक कारण ह्यामधे कर्मात विलीन होण्यास सांगितले आहे. कर्मविलय कसा होतो ते सांगताना ज्ञानेश्वर माऊली असे म्हणतात की

अकाळींचीं अभ्रें जैशीं। उर्मिवीण आकाशीं।

हारपती आपैशीं। उदयलीं सातीं ॥4.117॥ तैशीं विधि विधाने विहितें। जरी आचरे तो समस्तें। तरी तेथें ऐक्यभावें ऐक्यानें। पावतीचि गा ॥4. 118॥

अवकाळी आलेले मेघ जसे अट्टाहास न करता विरून जातात त्या प्रमाणे वेदांचे विवेचन ऐकून ऐक्यभावनेने केलेले अनुष्ठान ऐक्यालाच जाऊन मिळतात. 'यज्ञाय समग्रं कर्म प्रविलीयते' महर्षी व्यासांनी किती सुंदर रचना केली आहे. आत्म्याशिवाय आता इतर भौतिक विषयक संग नाहिसा झाला आहे. म्हणून श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे सांगत आहेत की ज्याची आसक्ती सर्व प्रकारे संपुष्टात येऊन तो खर्या अर्थाने मुक्त झाला आहे, ज्याचे चित्त परमात्म्यासंबंधी ज्ञानात स्थिर झाले आहे, अशा (परमेश्वरासाठी) यज्ञासाठी केली जाणारी कर्मे त्यातच विलीन होऊन जातात.

**ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्राह्मण हुतम्। ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना।।4.24।।**

ब्रह्म -अर्पणं, ब्रह्महविः, ब्राह्मण ब्रह्म-अग्नौ हुतम्,तेनब्रह्म-कर्म-समाधिनाब्रह्मएव गन्तव्यम्

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

अर्पणं यज्ञात अर्पण करण्यासाठी वापरलेली साधने अर्पण नपु प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

हविः आहुति हवि नपु. प्र. ए. व.

ब्रह्मण ब्रह्मरूप कर्ता ब्रह्मन् नपु. तृ. ए. व.

ब्रह्मअग्नौ ब्रह्मरूपी अग्नी ब्रह्मअग्नी पु. स. ए. व.

हुतम् आहुती देणे हु धातू क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

तेन त्याने तद् तृ. ए. व. ब्रह्म-कर्म-समाधिना ब्रह्माचे चिंतन हेच कर्म ब्रह्म-कर्म-समाधिन् नपु. तृ. ए. व.

ब्रह्म ब्रह्मपद ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

एव सुद्धा अव्यय

गन्तव्यम् जावे गम धातू तव्यत प्रत्यय नपु. प्र. ए. व.

ह्या श्लोकाचा लक्षार्थ समजून घ्यायला हवा.

सर्वं खल्विदं ब्रह्म।। छांदोग्य उपनिषद। 3.14.1।। हे उपनिषदिक सत्य ह्या श्लोकात प्रतिपादित केले आहे.

सर्वभूतेषु य: पश्येद् भगवद्भवमात्मन:।भूतानि भगवत्यात्मन्येष भगवतोत्तम: ॥11.2.45 ॥

जो मनुष्य सर्वत्र, सर्व गोष्टीत परमेश्वराला पाहतो, तो श्रेष्ठ भक्त आहे.

जर आपण यज्ञविधी डोळ्यासमोर आणला तर त्यावेळी वापरली जाणारी उपकरणे, अर्पण केल्या जाणाऱ्या हवी, यजमान, यज्ञकुंड ह्या सर्वांचे वर्णन येथे केले आहे. आधीच्या श्लोकात आपण यज्ञ हेच कर्म असे मानले तर सर्व कर्मे त्यातच विलीन होऊन जातात असे वाचले. कर्मयोगी ने लोकांचा उद्धार

करण्याच्या दृष्टीने कर्म केले असता कर्त्यास ते बाधक तर होत नाहीच, तर त्याच्या परमात्मा स्थित, स्थिर बुद्धीला, कर्ता, कर्म, करण आणि क्रिया हे सर्वच भेदशून्य होऊन ब्रह्म होते. अशा या ब्रह्मस्वरूप कर्माचे फळ, ब्रह्म होणे हेच असणार ना!

आता ह्या श्लोकाचा वाच्यार्थ असा की

यज्ञामधे अर्पण करण्याची साधने ब्रह्म, दिल्या जाणाऱ्या हवि ब्रह्म, ब्रह्मरूपी कर्ता, ब्रह्म हाच अग्नी आणि आहुती सुद्धा ब्रह्म. अशी व्यक्ती ज्याची ब्रह्म हीच कर्म समाधी आहे त्याच्या यज्ञाचे फळ सुद्धा ब्रह्मच आहे.

------------------------------------------------------------------------------------------------------------------

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते। ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति।।4.25।।**

अपरे योगिनः दैवम् यज्ञम् एव पर्युपासते ; अपरे यज्ञेन एव ब्रह्म-अग्नौ यज्ञं उपजुह्वति

अपरे इतर अ+पर पु. प्र. ब. व.

योगिनः योगीजन योगिन् पु. प्र. ब. व.

दैवम् देवतांचे दैव पु. द्वि. ए. व.

यज्ञम् यज्ञ यज्ञ पु. द्वि. ए. व.

एव सुद्धा अव्यय

पर्युपासते अनुष्ठान करतात परि+उप+आस धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

अपरे इतर अ+पर पु. प्र. ब. व.

यज्ञेन यज्ञाने यज्ञ पु. तृ. ए. व.

एव सुद्धा अव्यय

ब्रह्म-अग्नौ ब्रह्म-अग्नी पु. स. ए. व.

यज्ञं यज्ञ यज्ञ पु. द्वि. ए. व.

उपजुह्वति हवन करतात उप+हु धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

ब्रह्म आणि आत्मा एकच आहेत हे ज्ञानविज्ञान आपण आधीच्या श्लोकात वाचले. यास्काचार्यांनी आत्म्याची जी नावे दिली आहेत त्यात यज्ञ हे सुद्धा नाव आहे. कर्मकांडाचा आताइतका अतीरेक त्या काळात नसावा पण महर्षी व्यासांनी मात्र द्रष्टेपणाने त्यावर भाष्य करून ठेवले आहे. कदाचित नवशिक्या योगीसाठी हा उपदेशपर श्लोक असावा. सामान्य माणसाचा अध्यात्मिक प्रवास सर्वसाधारणपणे काही तरी मिळवणे म्हणजे अगदी आत्म शांती वगैरे पासून आत्मसमर्पण, आत्माहुती पर्यंत होत असतो. आत्म आहुति म्हणजे आपल्या अहंकाराची आहुती. दिव् धातू म्हणजे चमकणे पासून तयार झालेला शब्द देवता. त्या काळातील प्रचलित देवता म्हणजे इन्द्र, वरूण वगैरे. पंचमहाभूतांची पूजा, शिवाय गोमातेची पूजा ह्या सर्वाचे उल्लेख महाभारतात आपण वाचले आहेत. अध्यात्मिक उन्नती करत असताना योगी आपल्या इन्द्रियांची क्षमता सुद्धा वाढवत असतो, ज्याला सिद्धी प्राप्त होणे असे म्हटले जाते. पंच ज्ञानेन्द्रियांच्या मार्फतच त्याच्या ज्ञानाची वृद्धि होत असते. अशा ज्ञानी माणसाच्या डोक्याच्या मागे प्रकाशचक्र दर्शविण्याची पद्धत आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

काही योगी देवतांचे पूजन करून यज्ञाचे अनुष्ठान करतात तर काही योगी ब्रह्मरूप अग्नी च्या यज्ञात यज्ञामार्फत आत्म आहुति देतो.

---

**श्रोत्रादीनीन्द्रियन्याये संयमाग्निषु जुह्वति। शब्दादीनविषान्यान्य इन्द्रियाग्निषु जुह्वति।।4.26।।**

अन्ये श्रोत्र-आदिनि इन्द्रियाणि संयम-अग्निषु जुह्वति , अन्ये शब्द-आदीन विषयन् इन्द्रिय -अग्निषु जुह्वति

अन्ये अन्य पु. प्र. ब. व.

श्रोत्र-आदिनि श्रवण आदी श्रोत्र-आदिन् नपु. द्वि. ए. व.

इन्द्रियाणि इन्द्रिये इन्द्रिय नपु. प्र. ब. व.

संयम-अग्निषु संयमाने अग्नीत संयम-अग्नि पु. स. ब. व.

जुह्वति हवन करतात हु धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

अन्ये अन्य पु. प्र. ब. व.

शब्द-आदीन संभाषण इत्यादी शब्द-आदि पु. द्वि. ब. व.

विषयन् विषयात विषय पु. द्वि. ब. व.

इन्द्रिय -अग्निषु इन्द्रियरूपी अग्नीत इन्द्रिय -अग्नि पु. स. ब. व.

जुह्वति हवन करतात हु धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

आता ह्या श्लोकापासून ब्रह्म अग्नी यज्ञामधे आत्माहुती देण्याची प्रक्रिया हळूहळू विशद केली आहे आणि पुढचा 5वा अध्याय, ज्याचे नाव आत्मसंयम योग आहे त्याचे सूतोवाच केले आहे. कायमस्वरूपी मनाचा निग्रह ठेवणे म्हणजे एक प्रकारची अग्नी परीक्षाच. कारण अग्नीच्या संपर्कात आलेली गोष्ट कायमस्वरूपी नष्ट होते. योगी हे कसे साधतात ते सांगणारा हा श्लोक. कित्येक जण मौन व्रत पाळतात हे आपल्याला माहीत आहे. येथे श्रवण शक्ती च्या संयमाबद्दल सांगितले आहे. दुसऱ्या व्यक्तीचे बोलणे अजिबात न ऐकणे म्हणजे एकांतात राहणे. फक्त शब्दरूप नव्हे तर खाणाखुणा वर्जित अशा संभाषणावर प्रतिबंध, त्यासाठी दुसऱ्याचा आवाजही कानावर पडू न दिला तर सहाजिकच मनात कोणत्याही भावना उत्पन्न होण्याची शक्यताच नाही. म्हणजेच फक्त परमात्म्याचा विचार करायला लावणारा हा यज्ञ. आधुनिक काळात एकट्या राहणाऱ्या व्यक्तीस मोबाईल हा मोठाच आधार वाटतो कारण श्रवण आणि शब्दाशिवायच जगाच्या संपर्कात राहता येते. अर्थात ह्या संयमाचा उल्लेख श्रीमद्भगवद्गीतेत सापडत नाही. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

अन्य योगी श्रवण इत्यादी इन्द्रियांचे संयम रूपी अग्नीत हवन करतात तर अन्य शब्दादिक इन्द्रियांचे संयम रूपी अग्नीत हवन करतात.

**सर्वनिन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे।आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते।।4.27।।**

अपरे सर्वाणि इन्द्रिय-कर्माणि प्राण-कर्माणि च ज्ञान-दीपिते आत्म-संयम-योग-अग्नौ जुह्वति ।

अपरे इतर अ+पर पु. प्र. ब. व.

सर्वाणि समस्त सर्व नपु. द्वि. ब. व.

इन्द्रिय-कर्माणि इन्द्रिय-कर्मे इन्द्रिय-कर्मन् नपु. द्वि. ब. व. प्राण-कर्माणि प्राणकर्मे प्राण-कर्मन् नपु. द्वि. ब. व.

च सुद्धा अव्यय

ज्ञान-दीपिते ज्ञानाने उजळलेले ज्ञान-दीपित् पु. स. ए. व. आत्म-संयम-योग-अग्नौ आत्मसंयमाच्या योग अग्नीत आत्मन्-संयम-योग-अग्नि पु. स. ए. व.

जुह्वति हवन करतात हु धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

पतंजलि योग-सूत्रानुसार आत्म्याचे दोन प्रकार सांगितले आहेत. पराग-आत्मा म्हणजे इन्द्रिय सुखांची आसक्ती असणारा आत्मा. तर प्रत्यग-आत्मा म्हणजे सर्व भोगांपासून विरक्ती. आतापर्यंतच्या श्लोकात आपण 3 प्रकारचे यज्ञ संबंधी माहिती घेतली. आता आणखी 2 यज्ञ प्रकार ह्या श्लोकात सांगितले आहेत.

निर्विन्नानां ज्ञानयोगो न्यासिनामिह कर्मसु।

तेष्वनिर्विण्चित्तानां कर्मयोगस्तु कामिनाम् ॥श्रीमद्भागवतम् ।11.20.7 ॥

जे भौतिक सुखापासून विरक्त आहेत त्यांच्या साठी ज्ञानयोग. आणि ज्यांच्यामधे अजून आसक्ती आहे त्यांच्या साठी कर्मयोग आहे.

कित्येक किटक आणि प्राण्यांमध्ये आपण शीतकालसमाधी पाहतो म्हणजे काही विशिष्ट काळासाठी ते अन्न पाण्याशिवाय जिवंत राहू शकतात. योगींनी सुद्धा काही प्रमाणात असे सिद्ध केले आहे की ते श्वासाशिवाय फक्त प्राणशक्तीमुळे जिवंत राहू शकतात. श्वास रोखून धरलेल्या अवस्थेला कुंभक असे म्हणतात.

प्राणस्येदं वशे सर्वं त्रिदिवे यत् प्रतिष्ठितम्।

मतेव पुत्रन राक्षसस्व श्रीश्च प्रज्ञान च विदेही न इति।प्रश्नोपनिषद् । 2.13।।

---

येथे सर्व काही प्राण शक्तीच्या आधीन आहे तसेच स्वर्गातील सर्व गोष्टी प्राण शक्तीच्या आधीन आहेत. प्राणशक्ती मातेप्रमाणे पुत्राचे म्हणजे आमचे रक्षण करून आम्हाला समृद्धि आणि बुद्धि मिळो.

घेरण्ड संहितेतील पंचमोपदेशातील काही श्लोकात दहा प्राणांचे विस्तृत वर्णन केले आहे. मुख्य प्राण पाच - प्राण (हृदय) अपान (पोट, गुदा), उदान (हृदय, मस्तिष्क), समान (नाभी), व्यान (पूर्ण शरीर). ह्या शिवाय नाग (नाभीच्या वर) कूर्म (डोळे, पापण्या), देवदत्त (श्वासनलिका), कृकळ (गळ्याभोवती), धनंजय (मांसपेशी रक्त त्वचा).

ज्ञानाची तुलना प्रखर प्रकाशाशी केली आहे. आत्मसंयमा मुळे ज्ञान प्रखर होते. आत्मज्ञानामुळे मनावर ताबा मिळवता येतो.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

काही जण समस्त इन्द्रियांचे कार्य आणि प्राणांचे कार्य ज्ञानाच्या आधारावर आत्म संयम योग रूपी अग्नीत हवन करतात.

-----------------------------------------------------------------------------------------------------

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञाः योगयज्ञस्तथापरे।स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः।।4.28।।**

द्रव्य-यज्ञाः तपो-यज्ञाः तथा अपरे योग-यज्ञः संशितव्रताः यतयः च स्वाध्याय-ज्ञान-यज्ञाः ।

द्रव्य-यज्ञाः दानधर्माचा यज्ञ द्रव्य-यज्ञ पु. प्र. ब. व.

तपो-यज्ञाः तपस्या यज्ञ तपोयज्ञ पु. प्र. ब. व.

तथा अव्यय याप्रमाणे

अपरे काही जण अ+पर पु. प्र. ब. व.

योग-यज्ञाः योगाचा यज्ञ योग यज्ञ पु. प्र. ब. व.

संशितवृताः कठोर वृत्तीने पालन करणारे संशितवृत पु. प्र. ब. व.

सम+शो धातू तीक्ष्ण करणे क्त प्रत्यय

यतयः प्रयत्नशील यति पु. प्र. ब. व.

यत् धातू प्रयत्न करणे

च

स्वाध्याय-ज्ञान-यज्ञाः अभ्यासपूर्ण ज्ञान यज्ञ स्वाध्याय-ज्ञान-यज्ञ पु. प्र. ब. व.

आतापर्यंत आपण यज्ञाचे पाच प्रकार वाचले. आता आणखी काही प्रकार ह्या श्लोकात सांगितले आहेत.

द्रव्याचा वापर यज्ञात करणे म्हणजे दानधर्म करणे. अन्नदान, मंदिर उभारणी, घाट बांधणी अशा प्रकारच्या यज्ञास पूर्त म्हणतात. शरणागतांचे रक्षण, अहिंसा यांस दत्त म्हणतात. याचप्रमाणे पवित्र स्थानी तपश्चर्या करणे म्हणजे तपयज्ञ. अष्टांग योगातील सूत्रांचे कडक पालन करून योगयज्ञ करणे.

समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात्।पतंजली योगदर्शन-2.45

सर्व कर्मे ईश्वराला समर्पित केल्यास समाधीवस्था प्राप्त होईल.

तसेच पवित्र ग्रंथांचे अध्ययन ह्याला ज्ञानयज्ञ. त्याचप्रमाणे मनोनिग्रह ठेवून कठोर अशी व्रतवैकल्ये करून यज्ञ करणारे असे अनेक लोक आहेत.

-----------------------------------------------------------------------------------------------------------

**अपाने जुह्वति प्राण प्राणेऽपानं तथापरे।प्राणापानगति रुद्ध्वा प्राणायामपरायणाः।।4.29।।**

अपरे प्राणायाम-परायणाः  प्राण-अपान-गति रुद्धा अपाने प्राणम् जुह्वति तथा प्राणे अपानम्

**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति।सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषा:।4.30।।**

अपरे नियत-आहाराः प्राणान्  प्राणेषु जुह्वति । एते अपि सर्वे यज्ञ-क्षपित-कल्मषाः यज्ञविदः

अपरे काहीजण अ+पर पु. प्र. ब. व.

प्राणायाम-परायणाः प्राणायाम-परायण प्राणायामाच्या मार्गावर पु. प्र. ब. व.

प्राण-अपान-गती प्राण-अपानची हालचाल प्राण-अपान-गति स्त्री द्वि. द्वि. व.

रुद्धा रुध् धातू रोखणे क्त्वा प्रत्यय

अपाने नि:श्वासातून अपान पु. स. ए. व.

प्राणम् उच्छ्वास प्राण पु. द्वि. ए. व.

जुह्वति हवन करतो हु धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

तथा अव्यय याप्रमाणे

प्राणे उच्छ्वासातून प्राण पु. स. ए. व.

अपानम् नि:श्वास अपान पु. द्वि. ए. व.

अपरे काहीजण अ+पर पु. प्र. ब. व.

नियत-आहारः संयमित आहार नियत-आहार पु. प्र. ब. व.

प्राणान् नि:श्वास प्राण पु. द्वि. ब. व.

प्राणेषु निःश्वासात प्राण पु. स. ब. व.

जुह्वति आहुती देतात हु धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

एते हे एतद् पु. प्र. ब. व.

अपि सुद्धा अव्यय

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

यज्ञ-क्षपित-कल्मषाः यज्ञाद्वारे पापक्षालन करणारे यज्ञ-क्षपित-कल्मष पु. प्र. ब. व.

क्षप् धातू णिच् क्त प्रत्यय

यज्ञविदः यज्ञ जाणणारे यज्ञविद् पु. प्र. ब. व.

अष्टांग योगातील 4थ्या भागात प्राणायाम सांगितला आहे. प्राणायामातील 4 महत्वाची अंगे पूरक, रेचक, आंतरकुंभक आणि बाह्य कुंभक. ह्यांचेच वर्णन ह्या श्लोकात केले आहे. प्राणायाम हेच ज्यांचे अंत्य साधन आहे ते प्राणायाम-परायण आहेत.

---

प्राणप्रतिष्ठा आपण मूर्तीची करतो पण खरे तर हिंदी भाषेत माणसाला मूर्ती म्हणतात. म्हणजेच आपण जन्म घेताना परमेश्वराने प्राणप्रतिष्ठा केलेली असते. प्राणशक्तीचे अस्तित्व समजून घेतले की प्राण संकल्पनेसह श्वासावर नियंत्रण व पर्यायाने मनावर नियंत्रण आणणे समजू शकते.

पाच मुख्य प्राण..

प्राण, अपान, व्यान, उदान, समान१. प्राण :- हा वायू हृदयात राहतो व श्वासोच्छ्वास करतो.

२ अपान :- हा वायू मोठय़ा आतडय़ात राहतो व मलमूत्राचे विसर्जन करतो.३. व्यान :- हा सर्व शरीर व्यापून राहतो. ४. उदान :- हा कंठात राहतो व अन्नरसाचे विभाजन करतो. ५. समान :- हा नाभी कमलात राहतो व सर्व नाडयांना अन्नरस पुरवतो.

पाच उपप्राण आहेत. नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय १. नाग :- हा वायू ढेकर निर्माण करतो व शरीरातील अशुद्ध तत्त्वे बाहेर टाकतो. २. कूर्म :- हा वायू पापण्यांची उघडझाप करतो. ३. कृकल  हा वायू िशक व खोकला निर्माण करतो. ४. देवदत्त :- हा वायू जांभई निर्माण करतो. ५. धनंजय :- हा वायू मृत्यूनंतर आपल्या शरीरात राहतो.

प्राणायामाच्या साधारण क्रिया अशा

पुरक श्वास घेणे.

रेचक श्वास सोडणे.

अन्तर कुंभक श्वास घेतल्यानंतर रोखून ठेवणे.

बाह्य कुंभक श्वास सोडल्यानंतर, श्वास रोखून धरणे.

प्राणायाम केल्यास सर्व क्रियांवर ताबा मिळवता येतो. म्हणजे प्राणायाम करणे ही सुद्धा एक साधनाच.

आपले मन आणि श्वास यांचा जवळचा संबंध आहे. भीती प्रेम दुःख आनंद अशा निरनिराळ्या भावना जेव्हा आपल्या मनात असतात त्यावेळी आपल्या श्वासाची गती बदलत असते. अर्थातच श्वासाचे नियंत्रण करून आपण आपल्या भावनांचा अतीरेक टाळू शकतो. अष्टांग योगातील शेवटचा भाग म्हणजे समाधी.

---

काही नियमपूर्वक आहार घेणारे म्हणजे अल्प आहार किंवा उपवास करणारे ते सुद्धा प्राणवायूमध्येच प्राण वायूंचा होम करतात. हे सर्व जण यज्ञाचे रहस्य जाणणारे आहेत. आणि यज्ञ केल्यामुळे आपल्या पापांचा नाश केला आहे.

पापाचे दहन झाल्यावर काय होते ते ज्ञानेश्वरांनी सांगितले आहे

जया अविद्याजात जाळितां । जें उरलें निजस्वभावता ।

जेथ अग्नि आणि होता । उरेचिना ॥4.149॥

जेथ यजितयाचा कामु पुरे । यज्ञींचें विधान सरे ।

मागुतें जेथूनि ओसरें । क्रियाजात ॥4.150॥

सर्व अज्ञान जाळून टाकल्यामुळे जे सहजच बाकी रहाते, तेथे अग्नी व यज्ञकर्ता हा भेद उरतच नाही.

यज्ञकर्त्याच्या सर्व इच्छा ओसरतात आणि सर्व कर्मे संपून जातात. ह्या दोन श्लोकांचा थोडक्यात अर्थ असा की

काही जण अपानवायूमध्ये प्राणवायूचे अर्पण करतात. दुसरे काही प्राणवायूमध्ये अपानवायू सोडतात. प्राण आणि अपान वायूंच्या गतीला रोखून ठेवून ते प्राणायामात निपुण असतात.

दुसरे काही आहारावर नियंत्रण ठेवून प्राण वायू मध्येच प्राण वायूंचा होम करतात. हे सर्व जण यज्ञाचे रहस्य जाणणारे आहेत आणि यज्ञामुळे त्यांनी आपल्या पापांचा नाश केला आहे.

------------------------------------------------------------------------------------------------------------

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम्। नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरूसत्तम।।4.31।।**

हे कुरूसत्तम! यज्ञ-शिष्ट-अमृत-भुजः सनातनम् ब्रह्म यान्ति । अयज्ञस्य अयम् लोकः न अस्ति , अन्यः कुतः

हे कुरूसत्तम! हे कुरूश्रेष्ठ अर्जुन

यज्ञ-शिष्ट-अमृत-भुजः यज्ञापासून शिल्लक राहिलेले अमृत ग्रहण करणे

यज्ञ-शिष्ट-अमृत-भुज पु. प्र. ए. व.

शिष् धातू शिल्लक राहणे

भुज धातू खाणे

सनातनम्  शाश्वत सनातन पु. द्वि. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु द्वि. ए. व.

यान्ति प्राप्त होतात या धातू प्राप्त होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

अयज्ञस्य यज्ञ न करणाऱ्यांचे अ +यज्ञ पु. ष. ए. व.

अयम् हे इदम् पु. प्र. ए. व.

लोकः लोक पु. प्र. ए. व.

न अव्यय

अस्ति अस् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अन्यः अन्य पु. प्र. ए. व.

कुतः कुठे अव्यय

ह्या अध्यायातील 16 व्या श्लोकात कर्म किम्? अकर्म किम् ह्या प्रश्नांची उत्तरे देता देता यज्ञ ह्या संकल्पनेविषयी बरेच सांगून झाले आहे. यज्ञ म्हणजे बलिदान, यज्ञ म्हणजे आहुती. इदं न मम असे म्हणत सर्व कर्मे करायची. ईश्वराला सर्व काही अर्पण करून त्यातील थोडा भाग स्वतः साठी ठेवायचा.

3र्या अध्यायातील 13 व्या श्लोकात यज्ञात अन्न अर्पण करून झाल्यावर जे काही शिल्लक राहिल तेवढे फक्त ग्रहण केल्यास पाप मुक्ती होते असे म्हटले होते. त्याचा लक्षार्थ आपण समजून घेतला.

त्वयोपभुक्तस्रगन्धवासोऽलङ्कारचर्चिता:।उच्छिष्टभोजिनो दासस्तव मयां जयेमहि ॥ श्रीमद्भागवतम् 11.6. 46 ॥

मी फक्त तेच खाईन, प्राशन करेन धारण करेन तेथेच राहीन तेच करेन जे तुम्हाला अर्पण केले आहे. अशा प्रकारे जे शिल्लक आहे त्याला आपला प्रसाद मानून तेवढेच ग्रहण करून मोह-माया वर सहज विजय प्राप्त करेन.

कर्तव्यभावने पासून दूर जाऊन स्वार्थासाठी माणसे जेव्हा काम करायला लागतात तेव्हा आपोआपच संघर्ष निर्माण होतो, कलह निर्माण होतो. लोकांचे जगणे अवघड होऊ लागते. अशा व्यक्ती इतरांना नकोशा होऊ लागतात.

श्रीमद्भगवद्गीतेतील ह्या श्लोकात मृत्यूनंतरच्या प्रवासाचा उल्लेख केला आहे. ज्या व्यक्तीला ह्या जगात सुखाने जगता येत नाही तो परलोकात तरी आनंदी असेल का?

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे कुरूश्रेष्ठ! यज्ञात शिल्लक राहिलेले अमृत जे ग्रहण करतात त्यांना शाश्वत ब्रह्माची प्राप्ती होते. जे असा यज्ञ करत नाहीत त्यांना ह्या लोकांत तर नाहीच परलोकात तरी (ब्रह्म) काय मिळणार?

---

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे। कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे।।4.32।।**

एवम् बहुविधाः यज्ञा ब्रह्मणः मुखे वितताः तान् सर्वान् कर्मजान् विद्धि। एवम ज्ञात्वा विमोक्ष्यसे।

एवम् म्हणून अव्यय

बहुविधा विविध बहुविध पु. प्र. ब. व.

यज्ञा यज्ञ पु. प्र. ब. व.

ब्रह्मणः वेद ब्रह्मन् नपु. ष. ए. व.

मुखे वाणीतून मुख नपु. स. ए. व.

विततः विस्तृत वि+तन् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

तान् त्या तद् पु. द्वि . ब. व.

सर्वान् सर्वांना सर्व पु. द्वि . ब. व.

कर्मजान् कर्मातून उत्पन्न होणारे कर्मज पु. द्वि . ब. व.

विद्धि जाण विद् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

एवम याप्रमाणे अव्यय

ज्ञात्वा जाणून ज्ञा धातू क्त्वा प्रत्यय

विमोक्ष्यसे मुक्त होशील वि+मुच् धातू कर्तरि लृट लकार आत्मनेपदी म. पु. ए. व.

निरनिराळ्या 12 प्रकारच्या यज्ञाच्या पद्धती आतापर्यंतच्या श्लोकातून श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला सांगितल्या, जसे दैव यज्ञ (25), ब्रह्म यज्ञ (25), इन्द्रिय-नियंत्रण (26), इन्द्रिय विषयांची अस्वीकृति (26), मन पर नियंत्रण (27), द्रव्य यज्ञ (28), तपो यज्ञ (28), योग यज्ञ (28), स्वाध्याय यज्ञ (28), ज्ञान यज्ञ (28), प्राणायाम यज्ञ (29), नियताहार यज्ञ (30) ह्या सर्वांचे लक्ष्य एकच, ब्रह्माची प्राप्ती. सर्व यज्ञ शारीरिक मानसिक किंवा शाब्दिक अशा माध्यमातून उत्पन्न होत आहेत म्हणजेच याची उत्पत्ती आत्म्यापासून नाही तर प्रकृती पासून आहे. कारण आत्म्यापासून काहीही उत्पन्न होत नाही. आपली वाणी कर्म आहे , विचार कर्म आहेत , शरीरामार्फत केलेली कार्य कर्म आहेत, इन्द्रियांवरचे नियंत्रण कर्म आहे. संकल्पपूर्वक केलेले सर्व कर्मे हाच यज्ञ आहे. हा यज्ञ म्हणजे आपली नित्यकर्म आणि विशेष कर्मच आहेत. हे सर्व यज्ञ शारीरिक मानसिक किंवा शाब्दिक अशा माध्यमातून उत्पन्न होतात. कर्मसंन्यास योग असे नाव असलेल्या ह्या अध्यायात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की अशा अनेक यज्ञाचे वर्णन वेदांच्या (ब्रह्म) वाणीतून विस्ताराने सांगितले आहे, हेच ते ज्ञान तुला ह्या मोहमयी जगातून मुक्ती मिळवून देईल.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

अशा अनेक प्रकारच्या यज्ञांची माहिती वेदवाणीतून विस्ताराने सांगितली आहे. कर्मातून उत्पन्न होणाऱ्या यज्ञांना तू जाण, हे ज्ञान तुला कर्मबंधनातून मुक्त करेल.

---

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप। सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते।।4.33।।**

हे परन्तप ! द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञान-यज्ञः श्रेयान् । हे पार्थ ! सर्वम् कर्म अखिलम् ज्ञाने परिसमाप्यते

हे परन्तप !

द्रव्यमयात् द्रव्यमय पु. पं. ए. व.

यज्ञात् यज्ञापेक्षा यज्ञ पु. पं. ए. व.

ज्ञान-यज्ञः ज्ञान-यज्ञ पु. प्र. ए. व.

श्रेयान् श्रेष्ठ श्रेयस् पु. प्र. ए. व.

हे पार्थ !

सर्वम् सर्व नपु. प्र. ए. व.

कर्म कर्मे कर्मन् नपु. प्र. ए. व.

अखिलम् एकसंध अखिल नपु. प्र. ए. व.

ज्ञाने ज्ञानात ज्ञान नपु. प्र. स. व.

परिसमाप्यते समाप्त होतात परि+सम+आप् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

कर्मयज्ञ म्हणजे आहुती, हवन आणि फलप्राप्ती. ज्ञानाशिवाय यज्ञ हे भौतिक पातळीवरच मर्यादित राहतात. सर्व साध्यसाधनरूपी यज्ञांपेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. ज्ञान यज्ञ म्हणजे आत्मज्ञान. ज्ञानामध्येच सर्व कर्मांची परिसमाप्ती होते. मुळात ज्ञानयोगात फलप्राप्ती चा काही प्रश्नच नसतो. कर्म ही साधना आहे, तर ज्ञान हे साध्य आहे. ज्ञान यज्ञाचा अर्थच सत्याचा शोध. सत्याचे चिंतन आणि ध्यानधारणा. आत्मा आणि अनात्मा ह्या मधील फरक समजून घेणे.

'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म'।। विवेकचूडामणी 225।।

ब्रह्म हे सत्याचे रूप आहे, ज्ञानाचे रूप अनंत आहे. जेव्हा ब्रह्म हेच ज्ञान असते, तेव्हा ब्रह्म जाणणे म्हणजे पूर्ण ज्ञान होय. देव सर्वत्र आहे आणि सर्वांना पहात आहे हे जाणणे हेच खरे ज्ञान.

न ही ज्ञानेन सदृशं पवित्रं इह विद्यते म्हणजे ज्ञानासारखे पवित्र इथे काहीही नाही असे गीतेत (4.38) पुढे म्हटले आहे.

---

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे परन्तप, पार्थ! द्रव्यमय यज्ञापेक्षा ज्ञान यज्ञ श्रेष्ठ आहे. ज्ञानामध्येच सर्व कर्मांची पराकाष्ठा आहे.

---

**तद्विद्धि प्राणिपातेन परिप्रश्नेन सेवया।उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः।।4.34।।**

प्रणीपातेन परिप्रश्नेन सेवया तत् विद्धि तत्त्व-दर्शिनः ज्ञानिनः ते ज्ञानम् उपदेक्षयन्ति

प्रणीपातेन नतमस्तक होऊन प्रणीपात पु. तृ. ए. व.

प्र+णी+पत् धातू पडणे

परिप्रश्नेन जिज्ञासेने प्रश्न विचारून परिप्रश्न पु. तृ. ए. व.

परि+प्रच्छ धातू प्रश्न विचारणे

सेवया सेवा करून सेवा स्त्री तृ. ए. व.

तत् ते (ज्ञान) तद् नपु. प्र. ए. व.

विद्धि जाण विद् धातू जाणणे कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

तत्त्व-दर्शिनः जो तत्व पाहू शकतो असा तत्त्व-दर्शिन् पु. प्र. ए. व.

ज्ञानिनः विद्वान ज्ञानिन पु. प्र. ए. व.

ते तुला तद् पु. प्र. ब. व.

ज्ञानम् ज्ञान नपु. द्वि. ए. व.

उपदेक्षयन्ति उपदेश करतील उप+दिश् धातू लृट लकार प्र. पु. ब. व.

आधीच्या श्लोकात ज्ञानयज्ञ सर्वश्रेष्ठ आहे असे सांगून झाल्यावर आता हे ज्ञान मिळवायचे कसे त्यावर भाष्य करणारा हा श्लोक. गुरूशिष्यांचे पवित्र नाते उलगडून दाखवणारा हा श्लोक.

आचार्यवान् पुरुषो वेदः। छान्दोग्योपनिषद्-6.14.2

---

"केवल गुरु च्या माध्यमातून  वेदांचे ज्ञान प्राप्त करता येते. "अनाद्यविद्यायुक्तस्य पुरुषस्यात्मवेदनम्। स्वतो नसंभाव्यदन्यस्तत्त्वज्ञो ज्ञानदो भवेत्।।श्रीमद्भागवतम् 11.22.10।।

अनादी काळापासून अज्ञानाने आच्छादित व्यक्ती स्वतः आत्मसाक्षात्कारासाठी सक्षम नसते, त्याला अशा व्यक्तीची गरज असते ज्याला परम सत्याचे ज्ञान असेल आणि तो ते दुसऱ्याला देऊ शकेल. ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल । तैं मोहांधकारु जाईल ।जैं गुरुकृपा होईल । पार्था गा ॥4.171॥

ह्या श्लोकात गुरू सेवा करून विनम्रतेने जिज्ञासू वृत्तीने ज्ञान ग्रहण करण्यास सांगितले आहे. ज्ञानेश्वर माऊली गुरूकृपा झाली की ज्ञानप्राप्ती होईल असे सांगत आहेत. ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की जो परमसत्य जाणतो त्याला

नतमस्तक होऊन, सेवा करून, विनयशीलतेने प्रश्न विचारून ते ज्ञान जाणून घे. असे विद्वान तुला ज्ञानाचा उपदेश करतील.

---

**यज्ज्यत्व न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव। येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि।।4.35।।**

हे पाण्डव! यत् ज्ञात्वा पुनः एवम् मोहम् न यास्यसि, येन भूतानि अशेषेण आत्मनि अथो मयि द्रक्ष्यसि

हे पाण्डव!

यत् ज्याला यद् नपु. द्वि. ए. व.

ज्ञात्वा जाणून ज्ञा धातू जाणणे क्त्वा प्रत्यय

पुनः अव्यय

एवम् असे अव्यय

मोहम् मोह पु. द्वि. ए. व.

न अव्यय

यास्यसि प्राप्त होईल या धातू कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

येन ज्याने यद् नपु. तृ. ए. व.

भूतानि सर्व जीव भूत नपु. द्वि. ब. व.

अशेषेण अशेष पु. तृ. ए. व. शिष् धातू शिल्लक राहणे

आत्मनि स्वतःच आत्मन् पु. स. ए. व.

अथो नंतर अव्यय

मयि माझ्यात अस्मद् स. ए. व.

द्रक्ष्यसि पाहशील दृश् धातू कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला गीता सांगण्याचे कारणच हे होते की अर्जुनाला आपल्या सगे सोयरे यांना पाहून भावनिक चलबिचल निर्माण झाली. ज्ञान यज्ञ हा सर्व श्रेष्ठ यज्ञ आहे हे सुद्धा आपण वाचले.

पोहणे आणि सायकल चालवणे जसे आपण एकदा शिकल्यावर कधीच विसरत नाही त्याचप्रमाणे ब्रह्मज्ञान प्राप्त झाले की मोहाचा स्पर्श सुद्धा होत नाही. अज्ञानामुळे झालेला मोहच अर्जुनाला आपल्या सगे सोयरे यांना विसरू देत नाहीये. ज्ञानरूपी आत्मा मात्र सर्वत्र ब्रह्मच पाहतो. आत्म्याने धारण केलेली शरीरे निरनिराळी असली तरी सर्व आत्मे, ब्रह्म तत्वच होत. समुद्र आणि नदी जरी बाह्य रूपे निरनिराळी असली तरी दोन्ही जलतत्वेच. वाऱ्याची झुळूक आणि वादळ, दोन्हीमध्ये एकच वायू तत्व.

'तत् त्वम् असि! ' ह्या ब्रह्मवाक्याचा आता थोडाथोडा अर्थ समजायला लागला आहे.

आणखी एक विचार मनात येतो. श्रीभगवानकृष्णांनी असे सुद्धा म्हटले आहे की त्यांचे आणि अर्जुनाचे पूर्वी अनेक जन्म होऊन गेले आहेत. ब्रह्मज्ञान मात्र अर्जुनाला ह्या जन्मी मिळत आहे. ह्यावरून आपल्यामध्ये असणाऱ्या मोहमायेचे आपण स्वतःच विश्लेषण करू शकतो. हे करणे आवश्यक आहे कारण

'श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्' श्रीमद्भगवद्गीता 2. 29

वेद ऐकले म्हणजे त्याचा बोध होईलच असे नाही.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हे असे तत्वज्ञान जाणून तुला पुन्हा मोह होणार आहे.  हे पाण्डव! ह्या ज्ञानाने तू सर्व जगाला संपूर्णतः स्वतःमध्ये आणि माझ्या मध्ये पाहशील.

---

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृततमः। सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि।।4.36।।**

सर्वेभ्यः पापेभ्यः पाप-कृत्तमः असि चेत्  अपि ज्ञान-प्लवेन एव सर्वम वृजिनम्  संतरिष्यसि ।

सर्वेभ्यः सर्व पु. पं. ब. व.

पापेभ्यः पापांमधे पाप नपु. पं. ब. व.

पाप-कृत्तमः पापी (पाप करणारे) पाप-कृत्तम पु. प्र. ए. व.

असि असलास अस् धातू कर्तरि लट लकार म. पु. ए. व.

चेत्  जरी अव्यय

अपि सुद्धा अव्यय

ज्ञान-प्लवेन ज्ञान रूप नौकेच्या साह्याने

ज्ञान-प्लवन पु. तृ. ए. व.

एव सुद्धा अव्यय

सर्वम सर्व नपु. द्वि. ए. व.

वृजिनम् पाप सागर वृजिन नपु. द्वि. ए. व.

वृज् धातू त्यागणे

संतरिष्यसि तरून जाशील सम+तृ धातू कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

---

गुन्हेगारांचे पुनर्वसन हा खूप मोठा विषय आहे. त्याची दोन अंगे आहेत. एकतर गुन्हा करण्यासाठी जी परिस्थिती निर्माण झाली होती त्यामध्ये बदल घडवून आणायचा आणि दुसरे म्हणजे गुन्हा करणाऱ्याचे मतपरिवर्तन. आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे सामाजिक स्वीकृति. ह्या श्लोकात त्याही पलीकडे जाऊन भाष्य केले आहे. आजच्या युगात एकीकडे गुन्हे करत रहायचे आणि त्यावर उपाय म्हणून पापक्षालन सुद्धा करायचे असा काहीसा प्रकार दिसून येतो. त्या पार्श्वभूमीवर ह्या श्लोकाचा अर्थ काळजीपूर्वक समजून घ्यायला हवा.

विज्ञानसारथिर्यस्तु मनःप्रग्रहवान्नरः। सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परम् पदम्।। कठोपनिषद् 1.3.9।।

ज्याचा सारथी 'प्रज्ञा ' असते, मन हे संयमित लगामासारखे असते. तो विष्णूचे परम स्थान गाठतो.

अध्यात्मिक जगाच्या दृष्टीने मोह, माया, कर्मवासना हिच सर्व पापकर्मे. वाल्मीकि ऋषींचे संपूर्णतया झालेले परीवर्तन आपल्याला माहीत आहेच.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे सांगत आहेत की

जरी तू सर्व पापींपेक्षा अधिक पापी असलास तरी ज्ञानरूपी नौकेच्या साह्याने निःसंदेह पाप सागर तरून जाशील.

---

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मासत्कुरुतेऽर्जुन।ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा।।4.37।।**

हे अर्जुन! यथा समिद्धः अग्निः एधांसि भस्मसात् कुरुते , तथा ज्ञान-अग्निः सर्व-कर्माणि भस्मसात् कुरुते।

हे अर्जुन!

यथा जसे अव्यय

समिद्धः प्रज्वलित समिद्ध पु. प्र. ए. व.

सम+इन्ध् धातू प्रज्वलित करणे क्त प्रत्यय

अग्निः अग्नि पु. प्र. ए. व.

एधांसि इन्धनाने एधस् नपु. द्वि. ब. व.

इन्ध् धातू प्रकाशित होणे

भस्मसात् अव्यय

कुरुते करतो कृ धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

तथा त्याप्रमाणेअव्यय

ज्ञान-अग्निः ज्ञान-अग्नि पु. प्र. ए. व.

सर्व-कर्माणि सर्व कर्मांचे सर्व कर्मन् नपु. द्वि. ब. व.

भस्मसात् अव्यय

कुरुते  करतो कृ धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

ज्ञान यज्ञ बद्दल आतापर्यंत आपण खूप वाचले. ज्ञानाला ह्या श्लोकात अग्नी ची उपमा दिली आहे. त्याचा अर्थ आपण आयुष्याशी कसा जोडून घ्यायचा? अग्नीचा गुणच हा आहे की तो वाईट आणि चांगले असा फरक न करता सर्व काही भक्षण करतो. हाच गुण ज्ञान अग्नी चा पण आहे असे मानले तर पाप आणि पुण्ण्य कर्मे आणि कर्म बंधने ह्या अग्नीत भस्मसात् होत असावी. मग सहाजिकच प्रश्न असा मनात येतो की एखाद्या ज्ञानी सत्पुरुषांच्या आयुष्यात संकटे का येताना दिसतात. त्याचे उत्तर कदाचित असे असावे की तो जन्मतः त्याचे प्रारब्ध घेऊन येतो आणि काही अवधीनंतर त्याला ज्ञान प्राप्त होते, त्यानंतर केलेल्या कर्मांचे त्याच्यावर बंधन रहात नाही पण आधीच्या कर्मांची फळे त्याला मिळणार असतातच. थोडक्यात संचित कर्म आपण बदलू शकत नाही पण प्रारब्ध आणि आगामी कर्मे भस्मसात होऊ शकतात. अकाली मृत्यू चे असे स्पष्टीकरण देता येईल.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हे अर्जुन! जसे अग्नी सर्व ज्वलनशील गोष्टी भस्मसात् करून टाकतो तसेच ज्ञानाग्नी सर्व कर्मे भस्मसात् करून टाकतो.

---

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते। तत्सव्यं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति।।4.38।।**

इह ज्ञानेन सदृशम्  पवित्रम्  हि न विद्यते । कालेन योग-संसिद्धः स्वयं आत्मनि तत् विन्दति

इह ह्या जगात अव्यय

ज्ञानेन ज्ञान नपु. तृ. ए. व.

सदृशम् सारखे सदृश नपु. प्र. ए. व.

पवित्रम्  पवित्र पु. प्र. ए. व.

हि नक्कीच अव्यय

न अव्यय

विद्यते असते विद् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

कालेन कालपरत्वे काल पु. तृ. ए. व.

योग-संसिद्धः कर्मयोगाने सिद्ध झालेला योग-संसिद्धः पु. प्र. ए. व.

स्वयं अव्यय

आत्मनि स्वतः मधे आत्मन् पु. स. ए. व.

तत् त्याला तद् नपु. द्वि. ए. व.

विन्दति प्राप्त होते विद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात यज्ञांचे निरनिराळे प्रकार सांगितले.34 व्या श्लोकात आपण गुरू कडून ज्ञान प्राप्त करून घेण्यासंबंधीचा उपदेश वाचला होता. ह्या श्लोकात स्वयं असे म्हटले आहे. अशी व्यक्ती ज्याला योगसिद्धी प्राप्त झाली आहे असा. 6व्या अध्यायात ह्यालाच योगारूढ असा शब्द वापरला आहे.

श्रुतानुमानप्रज्ञाभ्यामन्यविषया विशेषार्थत्वात्।। पतंजली योग सूत्र 1.49।।

---

मौखिक परंपरा आणि अनुमानाने मिळवलेल्या ज्ञानापेक्षा रहस्यभेद करणाऱ्या अंतर्ज्ञानाचा विशिष्ट उद्देश आहे.

आत्मस्वरूपाचा दृढ परीचय होण्याचा प्रवास निष्काम बुद्धीने विहित कर्मे करण्यापासून सुरू होतो. इन्द्रिय विषयांचा त्याग करून, त्यामधून चित्त काढून घेतल्याने मन शुद्ध आणि निर्मळ होऊन मोक्ष मार्गावर वाटचाल चालू ठेवणाऱ्या मुमुक्षूला काही काळाने आत्मस्वरूपामध्येच ज्ञानाचा लाभ होतो.

आपल्या मनात शरीर शुद्धि बद्दल काही कल्पना आहेत. ह्या श्लोकात मनाच्या शुद्धि बद्दल भाष्य केले आहे. प्रथा परंपरा कर्मकांड अंधश्रद्धा ह्या सर्वांचा भेद करून केवळ ज्ञानाचे महत्त्व अधोरेखित करणारा अतिशय महत्त्वाचा श्लोक. विष्णुसहस्रनामात 'पवित्रानां पवित्रम्' असा भगवान विष्णूंचा उल्लेख आहे. ज्ञान सर्वात शुध्द आहे आणि तेच आपल्याला शुद्ध बनवू शकते. अर्थात ज्ञान मिळवण्यासाठी आपल्यालाच प्रयत्न करायला हवेत.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

ह्या जगात ज्ञानासारखे पवित्रता देणारे दुसरे काहीच नाही. कर्मयोगाने सिद्ध असा व्यक्ती कालपरत्वे स्वतः च हे ज्ञान प्राप्त करून घेतो.

---

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः। ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति।।4.39।।**

श्रद्धावान् , संयत्-इन्द्रियः तत्परः , ज्ञानम् लभते । ज्ञानम् लब्ध्वा अचिरेन् परमं शांतिम् अधिगच्छति।

श्रद्धावान् श्रद्धावत् पु. प्र. ए. व.

संयत्-इन्द्रियः संयमित संयत्-इन्द्रिय पु. प्र. ए. व.

तत्परः संलग्न तत्पर पु. प्र. ए. व.

ज्ञानम् ज्ञान नपु. द्वि. ए. व.

लभते प्राप्त करतो लभ् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

ज्ञानम् ज्ञान नपु. द्वि. ए. व.

लब्ध्वा प्राप्त करून लभ् धातू क्त्वा प्रत्यय

अचिरेन् तात्काळ अचिर नपु. तृ. ए. व.

चि धातू संग्रह करणे

परमं दिव्य परा स्त्री . द्वि. ए. व.

शांतिम् शांति स्त्री. द्वि. ए. व.

अधिगच्छति प्राप्त होतो अधि+गम् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

श्रद्धा आणि अंधश्रद्धा ह्या मधील वाद खूप जुना आहे. एकाची श्रद्धा, दुसऱ्याची अंधश्रद्धा असू शकते. आपल्या श्रदधेमुळे कोणाचे नुकसान होऊ नये. आपण आपले काम श्रद्धापूर्वक करावे यावर कोणाचे दुमत नाही.

जगद्गुरू शंकराचार्यांनी श्रद्धेबाबत असे म्हटले आहे.

गुरु वेदान्त वाक्येषु दृढो विश्वासः श्रद्धा।।

श्रद्धेचा अर्थ आहे गुरुंची वचने आणि शास्त्रावर वर दृढ विश्वास.

यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ।तस्यैते सारिआ ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥श्र्वेताश्वतरोपनिषद् 6.22।।

ज्यांची परमेश्वर आणि गुरू यांच्यावर प्रगाढ श्रद्धा असते त्यांच्या हृदयामधे वैदिक ज्ञान आपोआप प्रकट होते.

ह्या श्लोकात 3 गुणांचा उल्लेख केला आहे. 1. श्रद्धा 2. ज्ञानप्राप्ती हेच परमलक्ष्य आणि 3. इन्द्रियांवर संयम. काही गोष्टींचा लगेच परीणाम दिसून येतो जसे अंधार असलेल्या खोलीत दिवा चालू केला की ताबडतोब उजेड पसरतो. तसेच ज्ञान प्राप्ती झाली की ताबडतोब परम शांतीचा लाभ होतो. ज्ञान कसे प्राप्त होते हे सारांशाने सांगणारा हा श्लोक.

श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

श्रद्धावान्, संयमित आणि परमेश्वराशी संलग्नता असणाऱ्याला ज्ञानप्राप्ती होते. अशा ज्ञानाच्या लाभाने त्याला लगेच दिव्य शांती प्राप्त होते.

--------------------------------------------------------------------------------------------------------------

**नअज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति। नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः।।4.40।।**

अज्ञः अश्रद्धानः च संशय -आत्मा च विनश्यति । संशयात्मनः न अयं लोकः अस्ति , न परः न सुखम्

अज्ञः विवेकहीन अ+ज्ञ पु. प्र. ए. व.

अश्रद्धानः श्रद्धा रहीत अ+श्रद्धान पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

संशय-आत्मा संशयी संशय -आत्मन् पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

विनश्यति नाश होतो वि+नश् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

संशयात्मनः संशयी माणसाचे संशयात्मन् पु. ष. ए. व.

न अव्यय

अयं येथे इदम् पु. प्र. ए. व.

लोकः ह्या जगात लोक पु. प्र. ए. व.

अस्ति असते अस् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

न अव्यय

परः पर पु. प्र. ए. व.

न अव्यय

सुखम् सुख नपु. प्र. ए. व.

आधीच्या श्लोकात श्रद्धावान असणे किती महत्त्वाचे आहे ते सांगितले होते. खरे तर आपले आयुष्य श्रद्धेवर चालते. एखाद्या डॉक्टरवर लोकांचा जास्त विश्वास असतो तेवढा दुसर्या डॉक्टरवर असेलच असे नाही. तीच गोष्ट व्यावसायिकांच्या बाबतीत दिसून येते. एखादे दुकान कमालीचे प्रसिद्ध असते ज्याचे फार वेगळे कारण दिसून येत नाही. श्रद्धेबरोबर अर्थातच ज्ञानाचे महत्त्व सांगितले आहेच म्हणजे सारासार विचार सुद्धा तेवढाच महत्त्वाचा. संशयी वृत्ती असेल तर अक्षरशः स्वतः बरोबरच दुसऱ्याचे सुद्धा आयुष्य उध्वस्त होऊ शकते. एका धोब्याच्या संशयाने किती तरी आयुष्ये पणाला लागली.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे सांगत आहेत की

अज्ञानी, श्रद्धाहीन आणि संशयी प्रवृत्ती असलेल्या आत्म्याचा (व्यक्तींचा) नाश होतो. असा संशयी जीवात्म्याला ह्याच काय परलोकातही सुख मिळत नाही.

---

**योगसन्न्यस्तकर्माणं च्ज्ञानसञ्छिन्नसंशयम्।आत्मवन्तं न कर्माणि निबद्धन्ति धनञ्जय।।4.41।।**

हे धनञ्जय! ज्ञानसञ्चिचन्नसंशयम्  च योग -सन्न्यस्तकर्माणं आत्मवन्तं कर्माणि न निबध्नन्ति

हे धनञ्जय! ज्ञानसञ्छिन्नसंशयम् ज्ञानामुळे सर्व संशय मिटलेला

ज्ञानसञ्छिन्नसंशय पु. द्वि. ए. व.

योगसन्न्यस्तकर्माणं योगाच्या साह्याने कर्म त्यागलेला

योगसन्न्यस्तकर्मन् पु. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

आत्मवन्तं ब्रह्म स्वरूप आत्मवत् पु. द्वि. ए. व.

कर्माणि कर्मे कर्मन् नपु प्र. ब. व.

न अव्यय

निबध्नन्ति बंधन असते नि+बन्ध् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

आत्मज्ञान झालेल्या योगीचे वर्णन ह्या श्लोकात वाचायला मिळते. ज्ञान मिळवण्यासाठी गुरूचे योगदान सर्वोच्च असले तरी ते मिळवण्यासाठी स्वतःलाच प्रयत्न करावे लागतात. त्यासाठी स्वतःमध्ये काही बदल घडवून आणावे लागतात हे सर्व आपण आधीच्या श्लोकात वाचले. ज्ञान आपल्या मनातील सर्व शंकांचे निरसन करते. ज्ञानामुळे समर्पण येते. ज्ञानामुळेच व्यक्ती नैष्कर्म्य या अवस्थेला पोहोचतो. योगसन्न्यस्तकर्मन् म्हणजेच आत्मनिष्ठेच्या दृढ सामर्थ्याने ज्याने अहंकार जन्य कर्मांचा योगविहीत त्याग केला आहे. आत्मज्ञान झाल्यावर त्याचे परिणाम काय घडून येतात हे सांगताना श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे धनञ्जय! ज्याने योगाच्या द्वारा सर्व कर्मांचा त्याग केला आहे, ज्ञानामुळे त्याचे सर्व संशय लोप पावले आहेत अशा ब्रह्म स्वरूप आत्म्याला कर्मांचे बंधन नसते.

---

**तस्माद्ज्ञानसंभूतं हृतस्थं ज्ञानासिनात्मनः। छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत।।4.42।।**

तस्मात् हे भारत! अज्ञान-सम्भूतम् हृत्स्थम् एनम् आत्मनः संशयम् ज्ञान-असिना छित्त्वा योगम् आतिष्ठ, उत्तिष्ठ

तस्मात् म्हणून तद् पु. पं. ए. व.

हे भारत!

अज्ञान-सम्भूतम् अज्ञानातून निर्माण झालेला अ+ज्ञान+सम+भूत पु. द्वि. ए. व.

भू धातू होणे

हृत्स्थम् हृदयात असलेला हृत् स्थ पु. द्वि. ए. व.

एनम् हे एतद् पु. द्वि. ए. व.

आत्मनः आत्मन् पु. ष. ए. व.

संशयम् शंका संशय पु. द्वि. ए. व.

ज्ञान-असिना ज्ञानरूपी शस्त्राने ज्ञान असि पु. तृ. ए. व.

अस् धातू क्षेपणे

छित्त्वा छिद् धातू छिन्न करणे क्त्वा प्रत्यय

योगम् कर्म योग योग पु. द्वि. ए. व.

आतिष्ठ, सिद्ध हो आङः +स्था धातू सिद्ध होणे कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

उत्तिष्ठ ऊठ उद्+स्था धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दिव्यज्ञानयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥**

तिसऱ्या अध्यायात आपण कर्मयोगाचे आचरण आणि चौथ्या अध्यायात आपण कर्मयोगाचे तत्व जाणून घेण्यासंबंधी चे विवेचन वाचले. ज्ञान प्राप्ती करून कर्म केले असता कर्त्यास ते बंधनकारक नसते हाच त्याचा मतितार्थ. योगस्थ कुरू कर्माणि आणि समत्वं योग उच्यते असे दुसऱ्या अध्यायात सांगितले होते. तत्वज्ञान सुद्धा किती काव्यात्मक पद्धतीने सांगता येते ह्याचे हा श्लोक म्हणजे उत्तम उदाहरण.मन कुठे असते हे आजही नक्की दाखवता येत नाही. आधुनिक वैद्यक शास्त्राप्रमाणे ते आपल्या मेंदूतच असते पण येथे मात्र हृदय हा शब्द वापरला आहे.

मनातील शंकांचे निरसन केवळ योग्य ज्ञानाच्या आधारावरच करता येते. ह्या अध्यायाचे नाव ज्ञान कर्म योग. त्याची सार्थथा पूर्ण करून श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला युद्ध करण्यासाठी प्रवृत्त करत आहेत ते असे म्हणतात की

म्हणून हे भारत! तुझ्या हृदयात असलेल्या अज्ञानातून निर्माण झालेल्या शंकांचे निरसन तू ज्ञान रूपी शस्त्रांनी कर आणि ऊठ, कर्म योगासाठी (युद्धासाठी) सिद्ध हो.

अशा प्रकारे उपनिषद, ब्रह्मविद्या तसेच योगशास्त्र रूपी श्रीमद् भगवद् गीतेच्या श्रीकृष्ण-अर्जुन संवादातील दिव्यज्ञान-योग नावाचा चौथा अध्याय पूर्ण झाला.



---